# निवेदन



माझ्या निवडक लघुकथांचा एक संग्रह प्रसिद्ध करावा असें फार दिवस मनांत होतें. हा कथासंग्रह लौकरच प्रसिद्ध होणार अशी बातमीही 'प्रतिभा' पाक्षिकांत दीडदोन वर्षांपूर्वीच प्रसिद्ध होऊन गेली आहे. परंतु दरम्यानच्या काळांत अनेक अनपेक्षित अडचणी उपस्थित होऊन हा दिवस उजाडावयास इतका दीर्घकाळ लोटला आहे. तथापि इतक्या अवधीनें का होईना, माझ्या संकल्पाप्रमाणें हा कथासंग्रह प्रेमळ वाचकांचे हातीं देतांना मला निरतिशय आनंद होत आहे. गेल्या पांच सहा वर्षांत 'यशवंत', 'रत्नाकर', 'मनोरंजन', 'महिला', 'मनोरमा', 'स्त्री', 'किर्लोस्कर' वगैरे मासिकांत प्रसिद्ध झालेल्या माझ्या लघुकथांपैकीं बऱ्याच या संग्रहांत घेतल्या असून कांहीं लघुकथा नवीन आहेत.

गेल्या दहा वर्षांत मराठी लघुकथावाङ्मयांत बेसुमार वाढ जाहलेली असून अनेक नामवंत लेखकांच्या लघुकथांनीं आमचें कथावाङ्मय सजलेलें आहे. अधिकारी लेखकांच्या पदार्पणानें पुनीत झालेल्या या प्रांतांत मी माझें पहिलें पाऊल भीतभीतच टाकीत आहें. कांटेकोर तंत्र, भाषा, रचनाकौशल्य वगैरे कठोर कसोटींना माझ्या साध्यासुध्या गोष्टी कितपत टिकतील याची मला शंकाच आहे. म्हणून माझ्या या पहिल्या कृतीकडे प्रेमळ वाचकवर्ग कौतुकानें, सहानुभूतीनें व सदयतेनें पाहील अशी माझी अपेक्षा आहे.

लहान मुलांच्या खेळाचें थोर लोक सहृदयतेनें कौतुकच करीत नाहींत काय ?

मूल काळेसांवळें असलें कीं त्याला बाहेर नेतांना नीटनीटके सुंदर कपडे घालण्याची दक्षता बाळगतात. मला माझ्या पुस्तकाची अशी सजावट करतांना प्रो. वा. म. जोशी यांची प्रस्तावना व कु. अंबिकाबाई धुरंधर यांचें चित्र यांचा अलभ्य लाभ झाला आहे. याबद्दल मला वाटत असलेली कृतज्ञता कोणत्या शब्दांनीं व्यक्त करावी हेंच मला नीटसें समजत नाहीं. 'किर्लोस्कर' चे चालक श्रीयुत शं. वा. किर्लोस्कर यांचीही या बाबतींत फार मदत झाली हेंही आभारपूर्वक नमूद करणें आवश्यक आहे. तसेंच प्रो. रा. श्री. जोग (वुइलिंग्डन कॉलेज, सांगली), प्रो. वि. आ. आपटे ( फर्ग्युसन कॉलेज, पुणें), व श्रीयुत 'काव्यविहारी', बुधगांव, यांनीं वेळोवेळीं अत्यंत उपयुक्त अशा सूचना केल्या त्याबद्दल त्या सर्वांचे मी मनःपूर्वक आभार मानतें.

त्याचप्रमाणें 'आर्यसंस्कृति मुद्रणालया'च्या चालकांनीं छपाईचें काम सुबक मनाजोगें करून दिल्याबद्दल त्यांचेही मी मनःपूर्वक आभार मानतें.

सरतेशेवटीं मिरजमळा संस्थानच्या कलाभिज्ञ व कलाप्रेमी राणीसाहेब श्रीमंत सौ. लक्ष्मीबाईसाहेब पटवर्धन यांनीं हें पुस्तक स्वतांस अर्पण करण्यास परवानगी दिली त्याबद्दल मी त्यांची अत्यंत ऋणी आहें.

ता. ३१ जुलई १९३५.
बुधगांव ( M. S. M. ).

सौ. मालतीबाई दांडेकर

# प्रस्तावना



सामान्य मनुष्य हरतऱ्हेचे व्यवहार करतो व पाहतो, पण त्यांतील तथ्य किंवा स्वारस्य, त्यांतील विसंगति किंवा मौज, त्यांतील अर्थ किंवा चमत्कार कलावन्ताप्रमाणें त्याच्या ध्यानांत येत नाहीं; निदान कलावन्ताइतक्या स्पष्टतेनें, तीव्रतेनें, किंवा उत्कटतेनें ध्यानांत येत नाहीं. एवढी तरी निदान गोष्ट खरी कीं, वरील गोष्टी जरी स्पष्टपणें, तीव्रतेनें व उत्कटतेनें त्याच्या ध्यानांत आल्या तरी कलावन्ताला आपल्या मनांतील भावभावनांना व विचारविकारांना कल्पनानिर्मित प्रतिसृष्टीच्या द्वारें व्यक्त स्वरूप द्यावें अशी जशी अनावर इच्छा होते तशी त्याला होत नाहीं; आणि क्वचित् झाल्यास ती तृप्त करण्याचें त्याच्यांत सामर्थ्य नसतें. कलांपैकीं वाङ्मयिक कलेविषयीं मला जी थोडीबहुत माहिती आहे तीवरून तरी मला असें म्हणतां येईल कीं, वाङ्मयिक कलावन्ताला आपल्या कलाकृतीच्या द्वारें जें कांहीं सांगावयाचें असतें तें सामान्य लोकांना ठाऊक नसतें असें क्वचितच घडतें. तें त्यांना बहुधा ठाऊक असतें; पण कलावन्ताला जितक्या स्पष्टतेनें व पूर्णत्वानें तें कळलेलें असतें तितकें सामान्य लोकांना तें कळलेलें नसतें, किंवा कळलेलें असल्यास तें इतरांना सांगण्याची प्रबळ व अनावर इच्छा होईल

इतक्या तीव्रतेनें त्यांना तें भासलेलें नसतें, किंवा तीव्रतेनें भासलेलें असल्यास इतरांना समजेल इतकेंच नव्हे तर त्यांच्या भावनांना पटेल अशा कल्पनानिर्मित मूर्त स्वरूपांत सुंदर रीतीनें सांगण्याची त्यांच्यामध्यें शक्ति नसते.

उदाहरणार्थ, स्त्रियांना आर्थिक स्वातंत्र्य नसलें म्हणजे त्यांना पतीच्या ताब्यांत रहावें लागतें, आणि एखादे पतिराज त्यांच्या परस्वाधीनतेचा चांगलाच फायदा घेतात ही गोष्ट सर्वांच्या परिचयाचीच आहे. बरें, एखादी पत्नी सुशिक्षित असली आणि ती पैसे मिळवूं लागली, तर तेंही बऱ्याच पतींना खपत नाहीं—निदान रुचत तरी नाहीं, ही गोष्टहि सर्वांना ठाऊक आहे. अशा स्थितींत बायकांच्या मनाची कशी ओढाताण होत असेल याची बऱ्याच जणांना कल्पना करतां येईल. पण या प्रकारांविषयीं कविता किंवा लघुकथा लिहाव्यात अशी सामान्य लोकांना इच्छा होत नाहीं किंवा त्यांना तें सामर्थ्य नसतें. प्रस्तुत 'कथामालती' लिहिणाऱ्या लेखिकेसारख्या लेखिकांना किंवा लेखकांना या व अशाच सर्वपरिचित प्रकारांकडे पाहून हात जोडून स्वस्थ बसावेंसें वाटत नाहीं. त्यांतील विसंगति, अर्थ, स्वारस्य, मौज इतक्या उत्कटतेनें त्यांच्या प्रत्ययाला येते कीं, आपणांला जें कळलें व पटलें आहे तें लोकांनाहि कळेल व पटेल अशा रीतीनें त्यांना सांगावेंसें वाटतें व कल्पनारम्य वाङ्मयनिर्मिति करण्याकडे त्यांची प्रवृत्ति होते. कलावन्तांना 'नवीन', 'अभूतपूर्व', 'अज्ञातपूर्व' असें नेहमींच सांगावयाचें असतें असें नाहीं; त्यांना कांहीं उपदेश नेहमींच करावयाचा असतो असेंहि नाहीं. त्यांना जें सौंदर्य दिसलें,

किंवा जी मौज वाटली, जो आनंद झाला, जी चमत्कृति त्यांच्या नजरेस आली, जो अर्थ त्यांच्या मनांत बिंबला, किंवा ज्या स्वारस्याचा त्यांनीं आस्वाद घेतला, त्याला व्यक्त स्वरूप देऊन इतरांनाहि त्याचे वांटेकरी करावें अशी त्यांना दुर्दमनीय इच्छा होते, आणि मग ते आपली इच्छा तृप्त करून घेण्याकरितां काल्पनिक पण नामरूपादियुक्त, आभासात्मक पण सत्यगर्भ, कित्येक वेळां दुःखात्मक अनुभवांनीं परिपूर्ण, पण नेहमींच अलौकिक आनंदच देणारी, अशी प्रतिसृष्टि ते निर्माण करण्याचा प्रयत्न करतात.

प्रस्तुत 'कथामालती' नांवाच्या लघुकथासंग्रहाच्या लेखिकेचा प्रयत्न अशाच प्रकारचा आहे. या लघुकथांतले प्रसंग एकदोनखेरीजकरून नित्य परिचयाचेच आहेत. पण त्यांतील अर्थ किंवा स्वारस्य सहृदयतेनें ओळखून त्याचें सरळ व सुबोध भाषेंत सुंदर शब्दचित्र काढणें यांतच लेखिकेचें वैशिष्ट्य व कौशल्य आहे. उदाहरणार्थ, एखाद्या थोडेंबहुत शिकलेल्या पत्नीनें एखादी लघुकथा किंवा एखादी कविता हौशीनें लिहावी, पण विद्वान् पतिराजांना तिचें कांहींच वाटूं नये, त्यानें कौतुकाचा राहूं द्याच, पण उत्तेजनाचा एक शब्दहि फुकाचा बोलूं नये, उलट तिच्या तोंडावर दुसऱ्या लाडक्या लेखिकांची वेळीं–अवेळीं स्तुति करावी,—अशा वागण्यानें त्या बिचाऱ्या पत्नीला काय वाटत असेल हें सामान्य लोकांना समजतेंच. त्यांत सांगण्यासारखें विशेष कांहीं आहे, तें लोकांच्या नजरेस आणून देऊन त्यांच्या विचारांना व भावनांना चालना द्यावी, असें त्यांना सहसा वाटत नाहीं. पण सौ. मालतीबाई

दांडेकर यांची 'पहिली लघुकथा' वाचली म्हणजे ही साधीच गोष्ट किती सहृदयतेनें आणि मार्मिकपणें सांगतां येईल हें कळेल. विधवांचें दर्शन कित्येक लोक 'अशुभ' मानतात व घरांत बाल-मृत्यूसारखी एखादी कांहीं अनिष्ट गोष्ट घडली कीं त्या विधवेच्या माथीं त्याचें खापर फोडलें जातें (ज्यांच्यावर तिनें जिवापाड प्रेम केलेलें असतें व ज्यांच्याकरितां तिनें अतिशय स्वार्थत्याग केलेला असतो त्यांच्याकडूनहि धर्मभोळेपणानें असें केलें जातें)—असा प्रकार सत्यसृष्टींत कित्येक वेळां दिसून येतो व तो अनेकांच्या अनु-भवांतलाहि असतो. पण सौ. मालतीबाईनीं त्याचें हृदयस्पर्शी वर्णन 'अभागिनी' या लघुकथेंत जसें केलें आहे तसें थोडयांनाच साधेल. बायकोला टाकून देतांना कांहीं पुरुषांना दिक्कत वाटत नाहीं, आप-ल्याच बहिणीवर किंवा मुलीवर तसा प्रसंग आला तर आपणांला काय वाटेल याचा ते विचार करीत नाहींत. सौ. मालतीबाईची 'शाप' ही गोष्ट वाचल्यास टाकून दिलेल्या बायकांचे शाप त्यांच्या दुष्ट पति-राजांना बाधत असतील असें जरी वाटलें नाहीं, तरी त्यांनीं शाप देणें स्वाभाविक आहे, आणि ते खरोखरीच बाधतील तर दुष्ट पुरु-षांच्या दुष्टपणाला थोडा तरी आळा बसेल असें क्षणभर वाटूं लागतें.

सौ. मालतीबाईच्या सर्व गोष्टींत बायकांचीं दुःखें तन्मयतेनें ओळ-खून सहृदयतेनें चित्रित केलीं आहेत. पुरुषांना हीं दुःखें माहीत असतात, पण त्यांकडे कानाडोळा किंवा डोळेझांक करण्याची त्यांची प्रवृत्ति असते. हीं सर्व दुःखें मला माहीत होतीं; पण हें पुस्तक

वाचल्यावर या बाबतींत माझ्या भावना जेवढ्या प्रक्षुब्ध व्हायला पाहिजेत तेवढ्या होत नाहींत हें ढिलेपणाचें लक्षण आहे असें मला वाटूं लागलें. स्त्रिया जर अधिकाधिक लिहूं लागल्या तर त्यांच्या बाबतींत जाणतां किंवा अजाणतां होणाऱ्या अन्यायांची जाणीव अधिक तीव्र व कार्यकारी होईल यांत शंका नाहीं.

पण सौ. मालतीबाईंच्याच गोष्टींवरून सुचलेला हाही एक मुद्दा सांगितला पाहिजे कीं, पुरुषच नेहमीं चुकतात किंवा तेच वाईट असतात असें नाहीं. सौ. मालतीबाईंच्या गोष्टींत वर्णिलेल्या पुरुषदुष्टतेच्या सगळ्या हकीकती तात्पर्यार्थानें खऱ्या आहेत. पण त्यांच्या सर्वच गोष्टींत पुरुषदुष्टताच यावी हें कसेंसेंच वाटतें. एकेक गोष्ट घेतली तर ती चांगली व यथार्थ वाटते. पण सगळ्या गोष्टी वाचल्या म्हणजे मनावर असा परिणाम होतो कीं, यांत पुरुषच बहुतेक ठिकाणीं वाईट दाखविले आहेत, हें बरोबर नाहीं. तसेंच, बहुतेक सर्व गोष्टींत शोकरसाची छाया दिसते. यांत कलादृष्ट्या कांहीं दोष नाहीं; पण लेखकाची दृष्टि व वृत्ति एकांगी नसावी एवढी सूचना केल्याशिवाय राहवत नाहीं.

आतां ही गोष्ट मला मान्य केली पाहिजे कीं, लघुकथा लिहावयाची म्हणजे प्रपंचविश्वांतील एखाद्या लहानशा कोंपऱ्याचेंच विशिष्ट दृष्टीनें निरीक्षण-परीक्षण केलें पाहिजे. कादंबरीलेखकाला देखील सर्वांगीण दृष्टीनें लिहिणें कठीण असतें, त्यालाहि जीवितांतील मर्यादित क्षेत्राचेंच वर्णन करावें लागतें; पण सापेक्षतः त्याची दृष्टि अधिक विशाल व अधिक व्यापक असावी लागते. कादंबरीलेखकाची दृष्टि

सर्वांगीण व सर्वंकष असावी लागते, तर लघुकथालेखकाची दृष्टि एकाग्र व निश्चल असावी लागते, असें क्लेटन हॅमिल्टननें एके ठिकाणीं म्हटलें आहे.* सौ. मालतीबाईंची दृष्टि मर्यादित क्षेत्रांत—मध्यमवर्गीतील बायकांच्या सुखदुःखात्मक विविध अनुभवांच्या क्षेत्रांत, आणि त्यांतल्यात्यांत विशेषेंकरून दुःखात्मक अनुभवांच्या क्षेत्रांत—बरीच वावरते आणि तेथील देखाव्यांचें एकाग्रतेनें व मार्मिकपणें अवलोकन करते, ही गोष्ट लघुकथालेखनाच्या दृष्टीनें कदाचित् सोईची असेल. पण ती पूर्ण समाधान देऊं शकत नाहीं.

येथें पुनः हें सांगितलें पाहिजे कीं मध्यमवर्गीतील स्त्रीपुरुषांच्या गोष्टींना अलीकडे लोक कंटाळले आहेत असें पाहून कांहीं कादंबरीकार आणि लघुकथालेखक ज्या क्षेत्राची आपणांस मुळींच माहिती नाहीं त्या क्षेत्रांत उगीचच पाऊल टाकतात आणि आपण कांहींतरी नवीन केलें असें मानून घेऊन स्वतःची पाठ थोपटून घेतात. पण हें बरें नव्हे. मराठींतील बहुतेक लेखकांना मध्यमवर्गाचीच माहिती असते, आणि लेखिकांना त्यांतील स्त्रियांचीच प्रामुख्यानें

---

* "Balzac, George Eliot and Meredith look at life in the large; they try to "see it whole" and to reproduce the chaos of its intricate relations; but Poe, de Maupassant and Mr. Kipling aim rather to "see steadily" a limited phase of life, to focus their minds upon a single point of experience and then to depict this point briefly and strikingly."

( *Art of Fiction*, p. 184. )

या प्रोफेसरसाहेबांचें कल्पनाचित्र उभें राहील असें वैशिष्ट्ययुक्त व कथानक-पोषक वर्णन पाहिजे होतें. परंतु सौ.मालतीबाईंच्या गोष्टींतील हा प्रोफेसर अमूर्त व रूपरंगहीन, व विशिष्ट-लक्षण-रहित असा वाटतो, आणि म्हणून गोष्टीचा जितका परिणाम व्हावा तितका होऊ शकत नाहीं. अशा रीतीच्या तंत्रदृष्टया कांहीं उणीवा या 'कथा-मालती'मध्यें असल्या तरी एकंदरींत त्यांत यथार्थनिरीक्षण, सहानुभव, सद्विचारांचें व सद्भावनांचें वातावरण,उचित भाषापद्धति, इत्यादि गुण असल्यामुळें त्या वाचनीय व मननीय झाल्या आहेत. सौ. मालती-बाईंना विश्वविद्यालयीन शिक्षणाचा लाभ झालेला नाहीं; तथापि जें शिक्षण मिळालें आहे त्याला जन्मप्राप्त बुद्धिमत्ता व मार्मिकपणा यांचो जोड मिळाल्यामुळें ( व कालिदास म्हणतो त्याप्रमाणें स्त्रिया या 'अशिक्षित-पटु' असतात म्हणून ! ) त्यांच्या या गोष्टी कित्येक सुशिक्षित पुरुषांच्यापेक्षां सरस झाल्या आहेत. त्यांचे उच्चविद्याविभू-षित व गुणग्राही यजमानांच्या संगतींत त्यांच्या गुणांचा अधिकाधिक विकास होईल अशी आशा व्यक्त करून 'कथामालती'-पुष्पांचा हा गुच्छ रसिकांच्या पुढें ठेवतों.

पुणें. नं. ४.<br>ता. २२ जुलै १९३५.

वामन मल्हार जोशी

# अनुक्रमणिका





——:०:——

# पहिली लघुकथा



सिंधूचे डोळे त्या जाहिरातीच्या पानावरच खिळले गेले. तिची दृष्टी इतकी तन्मय झाली कीं, वाऱ्यानें फडफड करून पुस्तकाचीं पांच सात पानें उलटलीं गेलीं व अखेर तें पुस्तकही मिटलें गेलें हें सुद्धां तिला कळलें नाहीं.

कांहींतरी सुंदर गोडशी कल्पना तिला सुचली व " हं जमलं !" असें पुटपुटत भुंवया चढवीत ती आपल्याशींच एकदां हंसली. पुन्हां तिनें तें पान उघडलें. एखाद्याला त्या क्षुल्लक जाहिरातींत कांहीं देखील वाटलें नसतें; पण सिंधूला त्याचें आज इतकें महत्त्व वाटलें कीं, तोच मजकूर, तेच शब्द व त्याच ओळी वाचण्यात ती पुन्हां दंग झाली.

" येत्या जानेवारीच्या पहिल्या तारखेस सालाबादप्रमाणें

**' रसवंती ' मासिकाचा खास ' वनिता ' अंक**

आकर्षक चित्रें ! नयनमनोहर छपाई !

या अंकांत लेख, परीक्षणें, कविता वगैरे सर्व तऱ्हेचे स्त्रियांचेच लेख प्रसिद्ध होतील.— लेख पाठविण्याची मुदतीची तारीख ५ डिसेंबर ही आहे."

हीच ती जाहिरात ! सिंधूचे यजमान एक प्रख्यात शास्त्रज्ञ होते. लहानपणीं लग्न होऊन सिंधूताई त्यांची पत्नी झाली होती. सिंधू तडफदार, तल्लख बुद्धीची व हंसऱ्या डोळ्यांची मुलगी होती. उच्च शिक्षणाला वाव मिळाला नव्हता, तथापि गृहकृत्यांत ती दक्ष होती. थोडाबहुत तिला वाचनाचा नाद होता व आपण कांहींतरी लिहावें ही तिच्या मनांतली अमूर्त पण तीव्र इच्छा होती.

त्या जाहिरातीनें ह्या इच्छेला फार जोरांत चालना मिळाली. मोठ्या हुरूपानें लेखनसाहित्य घेऊन ती लिहावयास बसली. भरभर कागदावर कागद लिहून तयार होऊन पडूं लागले. दुपारीं एकाला सुरू केलेलें लिखाण संध्याकाळीं पांचला संपवून प्रसन्न मुद्रेनें तिनें टांक खालीं टाकला, एकदां आळस दिला व दौतीचें बूच घट्ट बसवीत वर पाहिलें— दारांत भाऊसाहेब उभे होते !

" काय एवढं लिहिलं आहेस आज !" त्यांनीं आश्चर्ययुक्त मुद्रेनें विचारलें.

" कांहीं नाहीं—" अस्फुट व अडखळत्या स्वरांत हे शब्द त्यांना ऐकूं आले व त्यापाठोपाठच—" मग दाखवतें " हेंही वाक्य हळू स्वरांत तिनें खालीं पाहात उच्चारलें.

" बरं आहे बुवाऽ ! तुझ्या मर्जीला येईल तेव्हां कां होईना. पण चहा करा ना ! "

सिंधूच्या हळुवार मनाला वाईट वाटलें. 'मग दाखवतें' हे शब्द संकोचामुळेंच तिनें काढले होते— पण तिची खरी इच्छा होती कीं, भाऊसाहेबांनीं त्याच वेळेला कौतुकानें व हट्टानें तें मागून घेऊन वाचावें !

बायकांच्या अंगीं आत्मसंयमनाचा गुण नैसर्गिक असतो कीं नाइलाजानें त्या आपलें मन मारून टाकतात तें कांहीं सांगतां येत नाहीं. पण एवढें खरें कीं, मनांतले सारे वाईट वाटणें बाजूस ठेऊन उसन्या प्रसन्नतेनें ती चहा करूं लागली.

चहा घेत असतांना पुन्हां भाऊसाहेब ती गोष्ट काढतील अशी सिंधूला जरा आशा होती, पण भाऊसाहेब ती गोष्ट केव्हांच विसरले होते. असल्या क्षुल्लक गोष्टी त्यांच्या मनांत राहिल्यावर ते चिकित्सक शास्त्रज्ञ कसले !

× × × ×

" हें पहा किनई, आपण पार्टीला गेलांत, अन् कोणशा आपल्या-कडे आल्या होत्या— थांबायला वेळ नाहीं म्हणून म्हणाल्या. अन् आपली चुकामूक पडली म्हणून त्यांना वाईट वाटलेलं दिसलं...!" सिंधूनें भाऊसाहेब पार्टीहून आल्याबरोबर जादा वृत्त सांगितलें.

" माझ्याकडे ! कोण बरं त्या ! नांव विचारलंस ना !..." कमालीची उत्सुकता त्यांच्या आवाजांत सामावली होती.

" हं...हें घ्यावं— नांवाचं कार्ड दिलं आहे त्यांनीं—" पोल-क्याच्या डाव्या खिशांतून दोन बोटांच्या चिमटींत एक चिमुकलें कार्ड बाहेर काढीत तिनें भाऊसाहेबांच्या हातावर ठेवलें.

झर्रकन् त्यांनीं त्यावरून नजर फिरवली व मोठ्यांदा तें वाचलें—

" मिस् शालिनी रायरीकर, बी. ए. "

"अर्रर्र ! शाली आली होती न् मी घरीं नसावं ! काय ऽ बुवा ! आजच कशी ही पार्टी उद्भवली कुणास ठाऊक !" हळहळत चुक्-

चुक् करीत भाऊसाहेब म्हणाले.

" ओळखीच्या होत्या वाटतं ! मी थांबा म्हटलं— पण वेळच नव्हता त्यांना ! कुठल्या पण त्या ! सांगावं गडे..." सिंधू लाडिक आवाजांत म्हणाली.

" शाली ना ! " भाऊसाहेब उल्हासानें व मनापासून सांगू लागले. " फर्ग्युसनला होती माझ्याबरोबर—अन् फारच उत्कृष्ट लेखिका आहे ती बरं कां ! 'कलिका' या टोपण नांवाखालीं ज्या लघुकथा अलीकडे सगळ्या मासिकांतून असतात ना त्या तिच्याच. कॉलेजमध्यें तर फारच फेमस् होती. अन् साहजिक आहे— फार स्मार्ट दिसे त्यामुळं..."

सिंधू हुं हुं करीत ऐकत होती. कलिकेच्या लघुकथांची ती मोठीशी चहाती नव्हती, पण इतकें भाऊसाहेबांचें तिजबद्दल रस-भरीत वर्णन चाललें असतांना उगीच प्रतिकूल मत देणें तिला बरोबर वाटलें नाहीं न् भाऊसाहेबांना तें आवडलें नसतें हेंही तिला ठाऊक होतें.

आपल्या लघुकथेबद्दल यावेळीं गोष्ट काढावी असें तिला वाटलें. भीत भीत तिनें विचारलें--" वेळ आहे कां जरा-- ?"

भाऊसाहेबांना हें विषयांतर रुचलें नाहीं. रुष्ट स्वरांत त्यांनीं विचारलें--" कां बरं ? "

" मी...एक गोष्ट...लघुकथा...लिहिलीय्, तेवढी वाचा-यला..." आवंडा गिळून थोडक्या शब्दांत सांगण्याचा तिनें प्रयत्न केला व सूक्ष्म नजरेनें भाऊसाहेबांकडे पाहिलें.

" तूं ऽ! अन् लेखिका... ! ह्यॅ ऽ ह्यॅ ऽ हां! चेष्टा नको बुवा करूं अशी ! मराठी पांच इयत्ता शिकलेली, धड पत्र देखील लिहितां येईना, व्याकरणशुद्ध न् मुद्देसूद असं ! न् गोष्ट कसली ! हॅट् !" भाऊसाहेबांनीं उत्तर दिलें.

सिंधूच्या हळव्या मनाला हा उपहास झोंबला. इतकी हेटाळणी करण्यासारखें त्यांत अद्भुत कांहींच नव्हतें. पण भाऊसाहेबांना विनोदी स्वरांत दुसऱ्याचे दोष निवडून टोले देण्याची कला— कळ चांगली साधत असे. पुष्कळांना हा विनोद ओव्हर न् मर्मभेदक वाटे. आजही सिंधूच्या मृदु हृदयाला शब्दशर भेदून गेले. बिचारी ! तशीच गप्प बसली. बोलून चालून हिंदू आर्यपत्नी ना ?

पांच एक मिनिटें शांतता होती. आपल्या त्या कटु वाक्याबद्दल भाऊसाहेबांनाच जरा वाईट वाटलें असावें. त्यांनीं आपण होऊनच पुन्हां विचारलें, " गोष्टीचा प्लॉट सांग पाहूं ! "

सिंधूला त्यांच्या स्वभावाचा परिचय होता. यावेळीं प्लॉट न सांगितल्यास पुन्हां चुकूनही भाऊसाहेब त्याबद्दल वास्तपुस्त करणार नाहींत, हें जाणून मघाच्या दुःखी कष्टी मनाकडे लक्ष न देतां तिनें सांगण्यास सुरवात केली.

—" एक जोडपं असतं; बायको अशिक्षित अन् नवरा फारच उत्कृष्ट व्याख्यान देणारा. त्याची व्याख्यानं तिला समजत नाहींत. तेव्हां ती म्हणजे दगड, तिला हृदय नाहीं असं समजून तो तिच्याशीं निष्ठुरपणानं वागतो, इतका कीं मनापासून, पण न बोलतां, त्याच्या प्रत्येक कृतीचं सगळ्यांत जास्त कौतुक करणारी त्याची बायको

झुरणीला लागते न् शेवटीं मरते न् मग पुष्कळ गोष्टींवरून त्याला तिची किंमत कळते, व डोळे उघडतात !"

कथानक संपवून आशातुर मुद्रेनें तिनें त्यांजकडे पाहिलें. गणिताचे पेपर उत्कृष्ट गेल्याची खात्री असूनही हुषार विद्यार्थ्याला शिक्षकांकडून शेरा ऐकण्याची जशी उत्कट इच्छा असते तशीच तिच्या मुद्रेवर उमटली होती.

" ऊंऽ... ! तितकंसं पटत नाहीं बुवा मनाला ! बायको मरण्याइतका निष्ठुरपणा नवऱ्याच्या हातून होणं संभवनीय दिसत नाहीं—" भुंवया उडवीत ते पुढें म्हणाले, " चांगला नाहीं बुवा हा प्लॉट. तुला नाहीं वाटत असं ? "

तिनें उत्तर दिलें नाहीं, पण तिची चर्या उतरली. व दोनचार मूक अश्रूही तिच्या नेत्रांतून ओघळले. तिच्या भावी मनोराज्यांचे सारे रम्य मिनार आज कोसळले नव्हते कां ?

पांचवी डिसेंबरची तारीख उजाडली. 'रसवंती'ला गोष्ट धाडण्याची शेवटची मुदत आज संपणार होती. 'वनिता' अंकासाठीं धाडण्याइतकी आपली गोष्ट सरस आहे असें सिंधूची मनोदेवता तिला पुनः पुनः सांगत होती. सिंधू चुळबुळ करूं लागली अन् तिला रहावेना; तिनें पुनः भाऊसाहेबांना सांगण्याचा निश्चय केला. किती वेडी आशा !

" ऐकलं कां... "

' सृष्टींतील पंचतत्त्वें ' नामक महान् ग्रंथावलोकनांत शास्त्रज्ञसाहेब गढून गेले होते. त्यांना प्रथम ही हांक ऐकूंच आली नाहीं.

प्रथमग्रासे मक्षिकापातच झाला ! पुन्हां नेटानें ती म्हणाली—

" म्हटलं, तेवढी गोष्ट धाडूं या कां आज 'वनिता' अंकासाठीं मग ! लिहून ठेवलेली आहे— "

" अं ! कोणती गोष्ट ? तीच ना...त्या झुरून मेलेल्या धाईची ! कीं आणखी लिहिली आहेस !— " या भाऊसाहेबांच्या उत्तरांतला उपहास अत्यंत तीव्रतेनें तिला जाणवला. प्रयत्नानें शांत मन ठेवून घुटमळत ती म्हणाली,... " हो तीच ! धाडावी कां ? आज शेवटचाच दिवस आहे... "

" आतां काय सांगावं ? " भाऊसाहेब म्हणाले, " अग, तुला काय वाटतं ? 'रसवंती' केवढं नामांकित मासिक, त्याचा दर्जा काय— त्याचे लेखक किती नाणावलेले अन् त्यांचं लिखाण किती हृदयंगम अन् श्रेष्ठ दर्जाचं ! त्यांत असल्या बाहुलाबाहुलीच्या गोष्टी कोण कशाला छापतंय् ? त्यांतून हा खास अंक ! उगीच लेख परत आला कीं तें तुला फार लागेल ! राहूं दे, जाऊं दे ती गोष्ट ! "

सिंधूची पुरी निराशा झाली. परत येणाऱ्या गोष्टीपेक्षां हे शब्दच तिला फार लागले. पांच तारीख संपली. सिंधूनें जड हातानें गोष्ट ट्रंकेंत ठेविली व डबडबलेले डोळे पांचसात वेळां पुसले.

* * *

नव्या वर्षाचा पहिला दिवस उजाडला. भाऊसाहेबांनीं पुढील छोट्या चौरंगावरील बिस्किटें, चहा, चिवडा वगैरेंचा समाचार घेत टपाल उघडलें. रसवंतीचा खास वनिता अंक नव्या नवलाईत व बहारदार स्वरूपांत त्यांच्या दृष्टीस पडला. प्रफुल्ल मुद्रेनें ते उद्गारले—

" ओ हो ! वनिता अंक आहे आज ! " नंतर त्यांनीं सिंधूला फर्माविलें. " एऽऽ ! आणखी थोडासा चहा घाल बघूं... " धुरामुळें कीं कशामुळें कुणाला ठाऊक पण सिंधूचे डोळे ओले दिसत होते.

" अरे वा ! शालीची गोष्ट आहेच कीं यांत— " एक गोष्ट वाचीत ते म्हणाले व ती भरभर वाचून टाकून मोठ्यांदा ते आपल्याशींच म्हणाले, " कमाल आहे बुवा या शालीची ! किती सफाईदार नाजुक भावना रंगवते...! असं लिहिलं पाहिजे. " याचवेळीं सिंधूनें कपांत चहा ओतीत ' अर्धा कप पुरे ? ' असा प्रश्न केला.

" पुरे, " ते सिंधूस म्हणाले–– " बघ, शालीनं किती सुंदर गोष्ट लिहिली आहे. उगीच नाहीं मी म्हणत. बी. ए. आहे ती. किती सुसंस्कृत अन् हृदयस्पर्शी गोष्ट वाटली. अन् भाषा तरी किती गोड अन् सफाईदार ! नाहींतर तुझी गोष्ट ! एकाची बायको झुरून मेल्याची ! "

सिंधूला संताप आवरणें अशक्य झालें. एवढे बडे शास्त्रज्ञ असून त्यांना एवढें कळूं नये कीं, खालच्या पायऱ्या चढल्यावांचून उन्नतीचें शिखर गांठतां येत नाहीं हें ! पेटी वाजवणारा काय एकदम उत्कृष्ट वाजवतो ? कला ही प्रयत्नसाध्य असते. हळुहळू कष्ट करून ती मिळवावी लागते. सुरवातीला ' कला येत नाहीं ' म्हणून हेटाळणी करण्याचें कारण काय ? असे विचार मनांत येऊन तिला फारच चीड आली. ' तुम्ही तरी मुळाक्षरं शिकल्यावांचून एवढे बडे विद्वान् झालांत कां ? ' हा प्रश्न अगदीं तिच्या जिभेवर आला. पण प्रयत्नानें तिनें मन आवरलें व ती गप्प बसली. थोड्याशा मिनिटांनीं

तिनेंच विचारलें—" काय कथानक आहे शालीच्या गोष्टीचं ?"

पुन्हां भाऊसाहेबांच्या मुद्रेवर प्रसन्नता दिसूं लागली. शालीचें नांव काढतांच ते प्रसन्न होतात व आपल्या गोष्टीचें नांव काढतांच रुष्ट होतात हें चाणाक्ष सिंधूनें केव्हांच ओळखलें होतें.

"आमच्या शालीच्या गोष्टीचं ना ?" कौतुकानें ते सांगूं लागले. " सांगतों हं— " पुन्हां एकदां गोष्टीची आमूलाग्र पाहणी करून नंतर त्यांनीं तिला त्या गोष्टीचा प्लॉट नीट समजावून दिला. नंतर उत्सुकतेनें त्यांनीं विचारलें— " कां आहेना मजा ! छान आहे किनई गोष्ट ! "

"हं, चांगली आहे खरी !" उसनें हंसून ती म्हणाली. बादशहानें ' क्यौं प्रधानजी ' म्हणून विचारतांच ' जी हुजूर ' म्हणून प्रधानजी मान तुकवतो ना ! तसेंच तापट पतीच्या सर्व बोलांना गरीब पत्नी अनिच्छया कबुली देत असते. वास्तविक तिला कांहीं ती गोष्ट मोठीशी आवडली नव्हती. पण भाऊसाहेबांच्या बी. ए. शालीची गोष्ट होती ना ती ! तिच्या गोष्टीवर अभिप्राय द्यायला लायकी पाहिजे असेंही पटकन् भाऊसाहेब म्हणायचे, अन् मग त्यांत शोभा कसली !

मनांतून मात्र तिला वाटूं लागलें कीं, आपली गोष्ट त्याहून सरस होती व ती खात्रीनें छापून आली असती. पुन्हां एकदां अपमान सहन करण्याइतकें घट्ट मन करून तिनें विचारलें, " माझी गोष्ट कांहीं इकडं अजून वाचली नाहीं ! एकदां वाचून कुठंकुठं काय चुकलंय् तें सांगावं म्हणजे... "

भाऊसाहेबांच्या नजरेंतली उत्सुकता मावळली व कपाळावर दोन आंठ्या उद्भवल्या.

" हें पहा, तुझा प्लॉटच चुकलाय्. गोष्टीचे शेवट दुःखकारक कशाला ? मी वाचीन केव्हांतरी. आतां वेळ नाहीं मला... " भाऊसाहेबांनीं तावडतोब तेथून रस्ता सुधारला.

सिंधू फारच संतापली. " त्या शाळीच्या गोष्टीवर चर्चा करायला वेळ होता न् माझ्या गोष्टीचं नांव निघाल्याबरोबर कपाळाला सत्राशें आंठ्या ! आतां पुन्हां जर माझ्या गोष्टीबद्दल नांव काढीन तर शपथ ! "

एवढ्या पुटपुटण्यावर एवढा थोरला राग कसा शमणार ? विचारी कपबशी मोरीवर एवढ्यांदा आदळली गेली कीं, तिची आयुष्याची दोरी सबळ म्हणूनच ती फुटली नाहीं. स्वयंपाकाच्या भांड्यांची खडबड, सिंधूचे दाणदाण पाय वाजणें, पाणी, दूध वगैरे वरचेवर सांडणें, भाजीला मीठ नाहीं– पोळयांत मोहन नाहीं– वगैरेवरून तिच्या त्या दिवशींच्या मनःस्थितीची कल्पना भाऊसाहेबांना झाली असती. पण वाचनांत त्यांचा इतका लय लागला होता कीं, बाह्यसृष्टीची त्यांना जाणीव नव्हतीच !

सिंधू खूप रागावली खरी, पण रागवून तरी ती काय करणार होती ! चार दिवस ती भाऊसाहेबांशीं धड बोलली नाहीं– पण त्यांना तरी पत्नीच्या खुल्या दिलाची आवश्यकता कुठें होती ! त्यांचा खेळ, क्लब, वाचन न् पान यथास्थित चालूं होतेंच. अन् मित्र ! सुधारक

मित्रांच्या फॅशनेबल गप्पा त्यांना खेडवळ बायकोच्या अशिक्षित बोलाहून महत्त्वाच्या वाटत होत्या.

× × ×

वरवर सिंधू तें विसरल्यासारखी वागूं लागली. पण मनांत शल्याप्रमाणें ती गोष्ट तिला सलत होती. त्यांतून जितक्यांदा शालीची अनावर स्तुती तिला निमूट ऐकून घ्यावी लागे तितक्यांदा ती खिन्न होई, संतापे व त्रास करून घेई.

ह्या हृद्रोगाचा तिच्या प्रकृतीवर परिणाम झाला. मनांत कुढणारी माणसं अशी मानसिक रोगानंच क्षीण होत जातात. सिंधू तशीच होत होती. दिवसेंदिवस तिला अशक्तपणा वाटूं लागला. अन् त्यांतच दिवस गेलेले– अन् सातव्या महिन्यांत तिला मुलगी झाली. आई अशक्त अन् त्यांतून मुलगी अपुऱ्या दिवसांची---बाराव्याच दिवशीं तिनें स्वर्लोकीं प्रयाण केलें. आधींच खिन्न असणाऱ्या सिंधूवर ह्याचा इतका परिणाम झाला कीं, तिला ताप येऊं लागला.

भाऊसाहेबांना लहर लागली तर ते तिची करमणूक होण्यासाठीं कांहीं कांहीं तिला वाचून दाखवीत. आज अशीच एक गोष्ट वाचून दाखवून ते आळसानें आरामखुर्चीवर मागें रेलून बसले व विचारूं लागले—

" आवडली कां गोष्ट ? कशी आहे, बरी आहे नाहीं ! " ...

" हूं ! " सिंधूनें एवढेंच उत्तर दिलें.

" वाऽ ! बरी म्हणजे उत्तम नाहीं वाटतं ! शालीची आहे ती

गोष्ट ! शाली फारच छान लिहिते. एकेकाला साधूनच जातं तें...' भाऊसाहेब सांगत होते.

" बस्स ! पुष्कळ झालं ! कंटाळा आला मला त्या शालीचं कौतुक ऐकून ऐकून ! ..." सिंधु एकदम उद्गारली.

तिटकाऱ्यानें व मनोवृत्ती असह्य होऊन सिंधूनें आज पहिल्यां दाच इतकें स्पष्ट व अप्रिय वाक्य उच्चारलें व भिंतीकडे तोंड वळवू ती स्वस्थ पडली.

भाऊसाहेब चमकले ! आजपर्यंत त्यांनीं तिच्या भावना पायदळ तुडवल्या होत्या. पण आजपर्यंत सहनशीलतेखालीं दडलेल्या त्या संता पाचा आज स्फोट होतांच त्यांना आठवलें कीं, शालीची स्तुति कर तांना पुष्कळदां आपण पत्नीची हेटाळणी केली होती. अन् खरेंच एका विदुषी, उत्कृष्ट लेखिका व स्मार्ट अशा मुलीबरोबर वरचेव आपल्या साध्यासुध्या पत्नीची तुलना करून पत्नीला तुच्छ लेख ण्याची तरी आपल्याला काय आवश्यकता होती ? आपल्याहून सुंदर श्रेष्ठ दर्जाच्या-- आय्. सी. एस्. झालेल्या अशा व्यक्तीची आपल्या समोर वरचेवर स्तुति करून तिनें आपल्याला हीन लेखलें असते तर ... !

सिंधूच्या दुखावलेल्या मनाची व आपल्या चुकीची त्यांना जाणीव झाली— पण ती फार उशीरां ! त्यानंतर त्यांनीं मुद्दाम सिंधूची गो काढून वाचली व तिलाही त्यामुळें बरें वाटलें ! पण ते दुर्दैवीच होते कारण आणखी आठवड्यानेंच खंगलेली सिंधू मरण पावली.

× × ×

ती गोष्ट वस्तुस्थितीचें निदर्शकच ठरली होती. भाऊसाहेबांनीं त्या वक्त्याप्रमाणेंच निष्ठुरपणें बायकोच्या हृदयाला जखमा केल्या होत्या. ‘ पत्नीकडं इतकं दुर्लक्ष होणं शक्य नाहीं ’ असं म्हणणाऱ्या एका शास्त्रज्ञाच्याच हातून तीच चूक घडली होती. पुढच्या डिसेंबरच्या पांच तारखेला मात्र भाऊसाहेबांनीं सिंधूच्या शेवटच्या इच्छेनुसार तिची ‘ पहिली लघुकथा ’ पुढील ‘ वनिता ’ अंकासाठीं धाडली.

या ‘ वनिता ’ अंकांत प्रथमच सिंधूची पहिली लघुकथा प्रसिद्ध झाली. संपादकांनीं तिच्या गोष्टीची अत्यंत स्तुति व अकालीं निधनाबद्दल खेद व्यक्त केला होता !

दुसरी गोष्ट शालीची होती ! !

अंक उघडून पाहतांच भाऊसाहेबांच्या हातून तो गळून पडला. व अश्रूंचा अभिषेक त्या अंकावर झाला. पण आतां कितीही अश्रु गाळले तरी सिंधू “ एकदां गोष्ट वाचावी गडे ” असा आग्रह करायला येणार नव्हती ! !



# समान हक्क

## बोले तैसा चाले त्याचीं वंदावीं पाउलें !

" मी रात्रीं जेवणार नाहीं, भूक नाहीं मला बरं कां ! " इतकें सैंपाकघरांत डोकावून रमेश ओरडला व टेनिसची रॅकेट आडवी-तिडवी हेलकावीत बाहेर पडला.

इंदू बाहेर आली. तिनें त्याकडे अगदीं पापणी न लववितां थोडा वेळ पाहिलें, मग अगदीं खिन्नवदन केलें व ती आंत गेली. 'ट्रंक स्वच्छ करून पुसून ठेवा ' या रमेशच्या आज्ञेची तिला आठवण झाली. एका ओल्या फडक्याच्या बोळ्यानें तिनें ट्रंक वरून स्वच्छ चकचकीत केली व झटकण्यासाठीं आंतलें सारें सामान बाहेर काढलें.

बोलूनचालून एका सुधारणाप्रिय तरुणाची ती ट्रंक ! त्यांत काय काय होतें म्हणण्यापेक्षां काय काय नव्हतें हेंच विचारा ना ? दाढीचें सामान, शर्ट्स, कॉलर्स, रोज पॉवडरचा डबा, फिक्झोराची बाटली, हॅजलिन् स्नो, लेमनक्रीम, पत्रांचें लहानसें बंडल, शर्ट्सचीं बटणें, रंगीत ख्रिस्टमस् कार्डस्, त्याच्या मित्रांचे बस्ट साईज फोटोज्... किती किती म्हणून नांवें लिहावीं... ! एवढें अनंतविध सामान सामावणाऱ्या ट्रंकेला माणसाच्या मनाचीच उपमा देतां येईल !

मनांत नाहीं का आनंद, सुख, दुःख, त्वेष, उद्वेग, द्वेष, टवाळखोरपणा वगैरे अनंतविध विकार दाटीवाटीनें रहात ! तसेंच !

या सामानांत इंदूला एक नोटबुक दिसलें तें सहज तिनें उघडलें. तें रमेशच्या निबंधांचें कच्चें टांचण होतें. "समान हक्क" या नांवाचा तो एक खूप मोठा निबंध होता; व त्यांतील विचारसौंदर्य, मुद्देसूदपणा व भाषाशैली यांबद्दल आधुनिक-सुधारणा-मंडळ नांवाच्या सोसायटीकडून त्याला दहा रुपयांचें मेडल मिळालेलेंही इंदूला माहीत होतें. तिनें वहीचें पहिलें पान उघडलें व ती वाचूं लागली. सुरवातीचींच वाक्यें अशीं होतीं:—

"स्त्री व पुरुष हा भेद निसर्गनिर्मित आहे. तरीपण एकाच वस्तूचीं दोन समान अंगें असावीं त्याप्रमाणें तीं एकमेकांस पूरक आहेत. मानवी जीवनास परस्परावांचून पूर्णता यावयाची नाहीं. सामाजिक दृष्ट्या तरी प्रत्येक स्त्रीला, पुरुषाला परंपरेनें प्राप्त झालेले न्याय्य हक्क मिळणें हें समाजधारणेस अत्यावश्यक आहे."

या वाक्यांनंतर स्त्रियांनाही भावना व मन, आकांक्षा न् इच्छा असतात, परंतु समाजाकडून त्याची कशी गळचेपी होत जाते याचें उत्कृष्ट विवरण केलें होतें. व 'प्रत्येक सद्गृहस्थानें आपल्याइतकीच पत्नीची योग्यता समजून तिला योग्य तो मानसन्मान व समान हक्क दिले पाहिजेत' असा समारोप केला होता.

तिनें तें नोटबुक मिटून दूर भिरकावून दिलें व खेदानें ती आपल्याशींच उद्गारली—"मनुष्याचे विचार अन् कृति यांत

जमीन अस्मानाचा फरक असतो म्हणावयाचा ऽऽ!" आणि तिच्या डोळ्यांत अश्रू तरंगू लागले.

× × ×

रमेशचा संसार दृष्ट लागण्याजोगा होता. टुमदार घर, राजाराणीचा संसार, बेताची नोकरी, अन् टिप्‌टॉप् सुंदर पत्नी ! मग रमेश सुखी होता यांत आश्चर्य कसलें ! इंदू सुद्धां भारी गोड समाधानी मुलगी होती. आनंदी, विनोदी रमेश तिला लहानपणापासूनच अत्यंत प्रिय होता व वडिलांच्या अनुमतीनेंच त्यांचा जवळजवळ प्रीतिविवाहच झाला होता. 'समान हक्कां'बद्दलचे त्याचे कळकळीचे प्रगतिपर विचार तर तिला अत्यंत आवडत. रमेशचेंही इंदूवर जिवाभावाचें प्रेम होतें व 'इतरांपेक्षां मी पत्नीला फारच उत्तम तऱ्हेनें वागवितों' असें देखील तो तिला वरचेवर बोलून दाखवी. अन् एवढें असून इंदूनें रमेशला नकळत अश्रू गाळावेत काय ?

रमेशचें बोलणें व कृति यांतली भयंकर तफावत प्रत्ययास आली कीं तिला भारी वाईट वाटे. रमेश मुद्दाम तिला दुखवीत होता असं मी म्हणत नाहीं; पण इतक्या स्वाभाविकतेनेंच पुरुषी वरचढपणा त्याच्या शब्दांतून ध्वनित होई कीं इंदूला तो अगदीं असह्य असा वाटे. अन् मग असेंच केव्हां तरी ती अश्रू गाळीत बसे.

× × × ×

"हें काय काढलं आहेस आज... ! कसला बेत आहे हा !..." रमेश गुरुवारीं ऑफिसांतून आला तेव्हां शेगडीवरच्या पातेल्यांत काजू व बटाटे यांचा खुसखुशीत चिवडा त्यानें पाहिला. पलीकडे

एका डब्यांत शंकरपाळे देखील त्याला दिसले. त्यांशिवाय शेगडीवर आणखी कांहींतरी खमंग पदार्थ तयार करण्यांत इंदू गुंतली होती तें निराळेंच ! खमंग म्हणण्याचें कारण एवढेंच कीं, तसला वास तेथें दरवळत होता. त्याचा हा प्रश्न ऐकून इंदू म्हणाली—

"ये ऽ त हो ऽ य ? माझ्या आत्याबाई—त्या बेळगांवला असतात ना ?— त्या येणार आहेत मला भेटायला अन् दोन तासांनीं येथून गाडी निघते तिनं जाणार आहेत परत. सवडच नाहीं म्हणे त्यांना रहायला आणखी !"

" कोण म्हणत होतं... ? "

" पत्र आलं कीं तीनच्या डाकेला !"

" होय का ! मग मी फारच दुर्दैवी आहें म्हणायचा ऽ..."

" दुर्दैवी ?..." चमत्कारिक मुद्रा करून हातांतलें काम थांबवून तिनें विचारलें.

" तर काय ! माझं डोकं भयंकर दुखूं लागलं आहे. फीव्हरिश् वाटतं आहे अन् आंग तर अगदीं मोडून आलं आहे ! पण तुझ्या आत्याबाई अन् त्यांचें आतिथ्य यांतून तुला माझ्याकडे पहायलासुद्धां फुरसत व्हायची कठीण !"

" हें कालचं नाटक बरं कां ? जागरणं सोसत नाहींत तर कशाला... ?"

" बरं बरं ऽ— तुला काय करायचं आहे त्याच्याशीं !"

संतापानें तणतणत तो वर गेला व दाराला आंतून कडी लाव-ल्याचा खण्कन् आवाज इंदूला ऐकूं आला. पण त्याच्या या अकारण

संतापाचा विचार करण्याइतकी तिला सवडच मिळाली नाहीं—कारण लगेच...

" कां इंदू... ! बरं आहे ना !" असे आत्याबाईचे शब्द तिला ऐकूं आले. कुशल प्रश्न झाल्यावर आत्याबाईनीं इंदूच्या आग्रहासाठीं फराळ करावयाचें कबूल केलें.

"पण इंदिरे, जांवईबुवा निजले आहेत वाटतं ! तो तिखटमिठाचा सांजा निवल्यावर बरा लागायचा नाहीं बरं का...तूं तो ऊन ऊन वर नेऊन दे आधीं त्यांना अन् म्हणावं आत्याबाईची जायची वेळ होत आली. त्या खालीं बोलावताहेत."

आत्याबाईच्या प्रेमळ सूचनेप्रमाणें तिनें सांजा, चिवडा, शंकरपाळे, व चहा एवढे पदार्थ एका ट्रेमध्यें घातले व ती वर गेली...पण दाराला आंतून कडी ! " हुश्श्... दार उघडावं जरा— हें पहा ऐकलं कां...म्हटलं जरा दार उघडायचं ! झोंप का लागली आहे...!" तिनें हळूच दार ठोठावीत म्हटलें.

रमेशनें खस्‌दिशीं कडी काढिली व डोळे चोळीत तो म्हणाला— " केवढ्यांदा दार ठोठावलंस... काय अडलं होतं एवढं... अगदीं... !"

ट्रे तिनें खालीं ठेवला व नम्रतेनें उत्तर दिलें, ' हा सांजा ऊनच बरा लागतो म्हणून... "

" पण माझं डोकं दुखत होतं हें माहीत असून तूं मला उठवलंस ! काय, सांजा मी कध्धीं खाल्लाच नव्हता कां पुढें मला खातां यायचा नाहीं ! कां तूं जन्मांत पुन्हां सांजा करणार नाहीं

आहेस... ? माणसाला जरा कॉमनसेन्स पाहिजे. मी कडक तऱ्हेनें वागत नाहीं त्याचा असा भलताच फायदा घेऊं नका बुवाऽऽ..." रमेशच्या या सरबत्तीखालीं इंदू बिचारी गोंधळून गेली. एवढं जळफळण्यासारखा अपराध तरी काय झाला हें देखील तिला कळेना.

पण बायकांच्या स्वाभाविक सहनशीलपणानें ते अपमानकारक शब्द दुर्लक्षून पुन्हां ती म्हणाली, "आत्याबाई निघाल्या आहेत परत... "

उपरोधिकपणानें तो म्हणाला, "मग मी त्यांचा टांगा हाकलायला जाऊन बसूं कीं काय ! "

तिला अतिशय संताप आला. त्याच्या दृष्टीकडे तीक्ष्णतेनें रोखून पहात तिनें ताडकन् उत्तर केलें— "तेवढीच महत्त्वाकांक्षा असेल तर अवश्य बसावं टांग्यावर..." अन् त्याच्याकडे वळूनसुद्धां न पाहतां ताड् ताड् पायऱ्या उतरून ती खालीं आली.

आत्याबाईंनीं हंसतमुखानें विचारलें—"येताहेत ना ! एवढा तोंडीं हुकूम ऐकल्यावर नाहीं कसले म्हणतात म्हणा ! "

"तसं नाहीं हो इथं !" कृत्रिम हास्य करीत इंदू सांगूं लागली. "आज किनई इकडे जरा ताप भरला आहे अन् डोकेंहि दुखतंय म्हणून..."

"असं होय, मग चल आपणच वर जाऊं या. तरी म्हटलं जांवईबुवा कां आले नव्हते!" असें म्हणत त्या वर गेल्या व त्यांची प्रेमळपणानं त्यांनीं विचारपूस केली. रमेशनें ह्यावेळीं कांहींही तिरसट वर्तन केलें नाही. उलट त्यांच्या आगमनाच्याच वेळीं नेमका हा

अनाहूत आजार उद्भवल्याबद्दल दिलगिरी व्यक्त केली. अन् जांवयाच्या सौजन्याबद्दल तोंडभरून स्तुति करीत आत्याबाईंनीं त्या उभयतांचा निरोप घेतला.

इंदूचा मनमोकळेपणा या प्रसंगानें कायमचा नष्ट झाल्यासारखाच झाला. दोनचारदां रमेशनें मुद्दाम विचारलें देखील,—"इंदू, रागावलीस माझ्यावर ?" पण अगदीं प्रयासानें हंसतमुख करून ती खालच्या आवाजानें म्हणे—"इश्श्, कुणी सांगितलं ? अन् असं केलं होतं काय आपण ? माझीच चूक झाली ! पुन्हां नाहीं मी त्रास द्यायची तसा."

या प्रसंगाला घडून सरासरी पंधरा दिवस झाले. इंदूला दोनतीन महिने गेले होते. त्यामुळें ओकाऱ्या, डोकें दुखणें, वगैरेंनीं ती बेजार झाली होती. त्या दिवशीं तर तिचें भयंकर डोकें दुखत होतें. सारें काम आवरून ती नुकतीच पडून राहिली होती.

"इंदू ऽ ऽ ऽ !" चिरपरिचित हांक तिला ऐकूं आली व त्याबरोबर रमेशही तिथें येऊन ठेपला. "हें काय, निजलीस ? बरं वाटत नाहीं वाटतं ? युवराज फार त्रास देताहेत आतांपासूनच नव्हे ?—" त्यानें प्रश्न केला.

"हं !"

"बरं ! एक काम करायचं आहे. तो माझा दूरचा मावस आतेभाऊ ठाऊक आहे ना तुला ?—तो आपला कृष्णराव गणपुले ? तो अन् त्याचे दोन स्नेही यायचे आहेत आत्तां चहाला. ही बघ चिठ्ठी आली आहे."

" हं ! "

" हं हं काय करतेस ? मी गोष्ट नाहीं आहे सांगत. चहाला कांहीं तरी करायला हवं म्हणून सांगतों आहे— हं, मग काय करणार ? सांजा कर ना, तिखटाचा ? त्या दिवशींसारखा उत्तम साधला पाहिजे बरं कां ! अन् दहीपोहे, बस्स् ! "

" पण डोकं फार दुखतंय् बाई माझं ! उठवतसुद्धां नाहीं मला. "

" असं काय करतेस अगदीं ? त्यांना काय बरं सांगूं मी ? मींच म्हटलं होतं मागें त्यांना या म्हणून ! "

" सांगा माझं डोकं दुखतंय् म्हणून ! मी नाहीं कां आत्याबाईना सांगितलं त्या दिवशीं ? अन् खरंच भयंकर त्रास होतोय् मला आज. दुपारचं सारं आज झांकून ठेवलं आहे तुमच्यासाठीं ! मी जेवणार सुद्धां नाहीं रात्रीं म्हणून. "

" काय उगीच अडवणूक करावी बरं !... "

" अडवणूक— ? " चिडून ती म्हणाली. " तुमचं डोकं दुखलं तर तुम्हांला प्रेमानं आणलेला तयार सांजा नुसता खायचेसुद्धां असह्य श्रम झाले; अन् माझं डोकं दुखलं तर ती अडवणूक होते ! चांगले आहेत समान हक्क ! "

रमेशला त्या दिवशीं आपण जरा चढेलपणानं वागलों ही जाणीव जाचीत होती खरी; पण पत्नीनं त्याबद्दल असा तिरस्कारपूर्वक उल्लेख केलेला त्याला मुळींच खपला नाहीं. आधींच तो तापट प्रकृतीचा माणूस होता; व 'समान हक्क' ह्या त्याच्या जिव्हाळ्याच्या विषयाची इंदूच्या शब्दांत अवहेलना झाली ती तर त्याला अगदीं मर्मी झोंबली.

त्याचे डोळे संतापानें विस्तृत व आरक्त झाले. शक्य तेवढा कठोरपणा आवाजांत आणीत त्यानें जोरांत उत्तर दिलें—

" आर्थिक समानता आल्यावांचून समान हक्क मागण्याचा तुम्हांला यत्किंचित्‌ही अधिकार पोहोंचत नाहीं, समजलं? पुन्हां तसली भाषा बोलूं नका, अन् मी बाहेर जाऊन दीड तासानं त्या लोकांना घेऊन येईन , तोंवर पोहे, सांजा अन् चहा तयार असलंच पाहिजे ! "

दाणदाण पावलें टाकीत डोक्याला त्यानें टोपी अडकविली अन् खाड् खाड् बूट वाजवीत तो बाहेर पडला.

आपल्या हृदयावरच त्याचे आघात होत आहेत असें तिला वाटलें. खिन्न मुद्रेनें तिनें त्याचें नोटबुक आणलें व उघडलें. पण तिच्या नेत्रांतून त्यावर इतके अश्रू गळूं लागले कीं ते निबंध, त्यांतले ते सुंदर विचार हें सर्व धुवून नष्ट झालें ! !



# मिळवती कायको

कमलाकर आज फारच आनंदांत होता. टेबलावरचा एक नोट-पेपर उचलून तो पन्नासदां वाचण्यांत तो अगदीं गर्क झाला होता. तें गिचमीड अक्षर त्याच्या वडिलांचें होतें. यापूर्वी वडिलांचें प्रत्येक पत्र एकदां झर्रकन् वाचून फेकून देण्याची त्याची वहिवाट होती. कारण पैशाची टंचाई, एखाद्या कुरूप मुलीबद्दल अवास्तव वर्णन, त्याच्या उधळपट्टीबद्दल कानउघाडणी, किंवा अशाच तऱ्हेचा त्याला अत्यंत अप्रिय वाटणारा मजकूर त्यांत असे. मग एकदां वाचून तें पत्र फाडून टाकायचें नाहीं तर काय पूजा करायची !

कमलाकर नोकरी लागून तीन वर्षें होत आलीं तरी अद्यापि अविवाहितच होता. कारण अनेक कारणांवरून जुळत असलेलें लग्न देखील मोडून जात होतें. कमलाकराच्या आपल्या भावी पत्नीबद्दल दोनच अपेक्षा होत्या. एक ती सर्वांगसुंदर पाहिजे व दुसरी ती बी. ए. झालेली पाहिजे. आईसाहेबांना वाटे, सुनबाई खालमानेची अन् बाळबोध वळणाची हवी; अन् जनूभाऊंनीं तर ठरवलेंच होतें कीं, टिप्पण जमलें न् हुंडा खूप आला तरच लग्न ठरवायचें ! तेव्हां या सर्वांच्या पसंतीचा कपिलाषष्ठीचा योग एकाही मुलीच्या बाबतींत जमला नव्हता यांत कुणाचा काय दोष !

शेवटीं कंटाळून गेल्यामुळें कमलाकरानें मनांतून—' एकदोन इयत्ता इंग्रजी झालेली देखील पुरे अन साधारण कां असेना—चालेल ' असें

ठरवून टाकलें होतें. कारण वडील जमदग्नीचा अवतार ! सांगणाराच त्यांच्या क्रोधानलांत दग्धप्राय व्हावयाचा ! आईसाहेबांनीं देखील आपला हेका सोडण्याचें ठरवलें. अशा रीतीनें कमलाकराचें लग्न ही अशक्य वाटणारी गोष्ट शक्य दिसूं लागली.

नंतर बऱ्याच मुली सांगून आल्या. सुशिक्षित हें उपपद चिकटवण्याजोगी त्यांत एकही नव्हती. त्या तशाच गेल्या आणि कमलाकराचा उदासीन एकाकीपणा व निराशा वाढत चालली. अशा परिस्थितींत त्याला बी. ए. बायको मिळण्याचा आशेचा किरण दिसतांच इतका आनंद व्हावा हें साहजिकच होतें.

" रामभाऊ कावळे यांची मुलगी पद्मा ही बी. ए. झालेली आहे, टिप्पणही तेहतीस गुण जमतात, दिसायला चांगली आणि सशक्त आहे. हुंडा सारा आठशेंच देणार आहेत; पण बाकी सारें जमतें आहे म्हणून मीही एवढें ओढून धरीत नाहीं. हें स्थळ आम्ही ठरवायचें ना ! तुझें उत्तर आलें कीं मुहूर्त ठरवून टाकणार आहें. पद्मेचा फोटो सोबत धाडला आहे. इ० इ०..." याच चार ओळी तो वरचेवर वाचीत होता. वडिलांबद्दल त्याला एकाएकीं कितीतरी आदरबुद्धि वाटूं लागली. फोटो तर त्यानें खोलींत लावूनच टाकिला !

× × ×

पद्मा–कमलाकर यांचें लग्न होऊन महिना होत आला. नूतन परिणीत पत्नीला घेऊन कमलाकर लहानपुराला आला व नव उल्हासानें त्यांच्या सुशिक्षित संसाराला सुरवात झाली.

" पाहिलं कां ? " हातांतला कागद कमलाकराच्या डोळ्यांसमोर धरीत पद्मेनें त्याला आनंदाची वार्ता सांगितली. " परवांच मी इथली हेड्मास्तरिणीची जागा मला मिळावी म्हणून अर्ज केला होता ना !— त्याचं उत्तर आलं आहे नेमणूक केल्याबद्दल ! सध्यां नव्वद पगार मिळेल. किती बरं झालं नाहीं ? "

" तर ! बरं म्हणजे ! माझे एकशेंदहा न् तुझे नव्वद— दोनशें कांहीं कमी पडायचे नाहींत आपल्या दोघांना सध्यां. पण तुला घरचं काम न् नोकरी झेपेल कां ? " कमलाकरानें शंका प्रदर्शित केली.

" इश्श् ! दहाला तुम्ही जेवून ऑफिसांत गेलांत कीं मी रिकामीच असतें कीं संध्याकाळपर्यंत ! तो वेळ अनायासें सार्थकीं लागतो आहे ह्याचंच मला समाधान वाटतंय्... "

ह्या उत्तरांत अंतःकरणपूर्वक समाधानाचा अंश आढळून कमलाकर आनंदित झाला !

× × ×

" छन्...छन्...छन्... " ह्या आवाजाबरोबरच एक, दोन, तीन वगैरे आकड्यांचे उच्चारही ऐकूं येऊं लागले. कमलाकरानें मुद्दाम खोलींत जाऊन पाहिलें. रुपये मोजण्यांत पद्मा गर्क झाली होती. दहा दहा रुपयांची एकेक अशा नऊ चळती करून तिनें त्याकडे पाहात म्हटलें—" हें पाहून त्यांना किती आनंद होईल ! हा पहिला पगार ! "

" खरोखरच तुझा हा पहिला पगार पाहून मलाही फार आनंद झाला आहे !— "

अनपेक्षित उत्तरानें चमकून मागें पाहून लाजून पद्मा म्हणाली, " केव्हा यायचं झालं ? मी आपली माझ्या नादांतच होतें. पहिली कमाई या दृष्टीनें या नव्वद रुपयांचें महत्त्व नाहीं कां ? मला तर कितीतरी आनंद झाला आहे. "

" अग, महत्त्व म्हणजे काय ? तुला नुसतंच महत्त्व वाटतं आहे. मला तर बरोबरीनं कौतुकही वाटत आहे. हे पैसे तुला बक्षीस ! घरांत घ्यायचे नाहींत ते. तुझ्या आवडीच्या वस्तू घे त्या पैशांत... अं ऽ ! " सप्रेम नजरेनें कमलाकरानें सांगितलें.

पद्मेच्या नेत्रांतही आनंदमिश्र प्रेम खेळूं लागलें. तिला स्वत:बद्दल धन्यता वाटूं लागली.

× × ×

" आतां हा पाहून त्यांना किती आनंद वाटेल ! " पद्मा विचारांत गुंग झाली होती. समोरच एक काळा सोनेरी बुट्ट्यांचा शालू होता. त्यावर नीलवर्ण बनारसी खणाचा सुंदर ब्लाऊज होता. थोडक्याच वेळांत " हं, असं करावं... " असें म्हणून पद्मा उठली. तिनें साबण लावून स्वच्छ तोंड धुतलें व त्यावर पॉवडरचा हलका हात फिरवला. केसांचे फॅशनेबल तऱ्हेनें फुगे पाडून तिनें पिळाचें चक्कर घातलें. नंतर बारीक कुंकुमतिलक रेखून तिनें तो शालू व ब्लाऊज परिधान केला. तिच्या मूळच्याच गौर तनूला तो काळा शालू अप्रतिम खुलून दिसत होता. वरचेवर ती दारांत जाऊन पाही अन् निराश होऊन परत येई.

कमलाकर थोड्या वेळांत आले. त्यांचें पत्नीकडे लक्षही गेलें

नाहीं. विमनस्क स्थितींत ते आरामखुर्चीवर पडून राहिले. " पेन्श-नींत एकदम काढल्यानें पैशाची ओढाताण होत आहे. सूनबाईचे न् तुझे मिळून दोनशें रुपये तुला मिळतात- तेव्हां पन्नास तरी इकडे धाडीत जा, " असें वडिलांचें आज्ञापत्र नुकतेंच त्यांना आलें होतें व मानसिक व्यग्रतेस तेंच कारण होतें.

" काय होतंय् आज ? डोकं कां दुखतंय् ? " मृदु वीणारव ऐकून त्यांनीं वर पाहिलें. तो काळा शालू पाहून त्यांच्या खिन्नतेंत आणखी भरच पडली.

एकशेंऐशीं रुपयांचा तो शालू ! आपल्याला तो एवढ्यांतच घेणें शक्य नव्हतें; पण पुढें घेऊं म्हणून आपण आश्वासन दिलें होतें. तरी पण आपल्याला न विचारतां आधींच पद्मेनें आपला दोन महिन्यांचा पगार देऊन शालू घ्यावा याचें त्यांना फारच वैषम्य वाटूं लागलें. तिला आवडीच्या वस्तु पुरविण्यास आपण समर्थ नसलों तरी तिनें स्वतः पैसे मिळवून पाहिजे त्या वस्तू घ्याव्या यांत कमलाकराला मोठीच मानहानि वाटूं लागली. काय हें ? तिनं नुसतं विचारूं सुद्धां नये ! आपल्याबद्दल इतकी बेपर्वाई ?... पद्मेला काय कल्पना त्याच्या बिघडलेल्या मनाची ? तिनें मोठ्या उत्सुकतेनें विचारलें—
" पण हा पाहिला कां ? कसा काय दिसतो मला ? अंऽ ?..."

" छान ! सुरेख ! झकास दिसतो ! " निर्विकार चहऱ्यानें कमला-कर म्हणाला. पण त्या उत्तरांत भावनेचा ओलावा नव्हता किंवा मनोविकारांचें मिश्रण नव्हतें. कांहींतरी उत्तर द्यायलाच हवें म्हणून तो हें वाक्य बोलला होता. मनांतून त्याला राग आला होता. पण

तो दर्शविणें त्याला योग्य वाटलें नाहीं. पद्मेला वाईट वाटलें. एकादी गोष्ट दुसऱ्यानें चांगली म्हणावी म्हणून हेतुपुरःसर करावी अन् लोकांनीं त्याबद्दल नाखुषीच दाखवावी; म्हणजे मन जसें खट्टू होतें तसेंच तिच्या बाबतींत झालें. तिच्या चेहऱ्यावर उदासीनता आली. तिकडे कमलाकरानें दुर्लक्ष केलें. तिच्या बेपर्वा वृत्तीला हें शासनच तो समजत होता.

दुसऱ्या महिन्यापासून त्यानें स्वतःच्या पगारांतले पन्नास रुपये निमूटपणें वडिलांकडे धाडण्यास सुरवात केली.

× × ×

तिचा पगार दहा रुपयांनीं वाढला होता व तिला कायम करण्यांत आलें होतें. ज्या दिवशीं हें वर्तमान तिनें आनंदानें कमलाकरापाशीं सांगितलें त्या दिवशींही तो अत्यंत सुन्न बसला होता. योगायोग असा कीं, त्याच दिवशीं इतरांबरोबर त्याच्या पगारांत शेंकडा पांचप्रमाणें कपात करण्यांत आली होती ! ! आतां त्यानें बायकोच्या आनंदांत भाग घ्यावा कीं तिनें त्याच्या खिन्नपणांत भाग घ्यावा ? सूर्य हळूहळू अस्तास जात असतांना चन्द्रमा तेजस्वीपणानें चमकण्यास सुरवात होते. आपला उत्कर्षसूर्य मावळत आहे व त्याच वेळीं तिचा कीर्तिचंद्र जगाच्या आकाशांत प्रकाशित रहाणार— ही कल्पना त्याला दुस्सह झाली. बायकोची वाहवा झालेली चांगली खरी, पण ती कोठपर्यंत ? लोक नवऱ्याहून बायकोलाच जास्त मान देऊं लागले तर तें अगदीं लाजिरवाणें नव्हे कां ? कमलाकराला लोकांनीं तर अगदीं भंडावून सोडलें.

" काय कमलाकर, तुमच्या मिसेस्ना दहा रुपये वाढले न् तुमचे पांच कमी झाले म्हणे— म्हणजे एकंदरींत यांत पांच रुपये तुमचा फायदाच झाला आहे, " वगैरे, वगैरे एक ना दोन...! लोकांचीं तोंडें कोण आवरूं शकणार ?

शाळेबरोबर तिच्या पाठीमागचा व्याप भयंकर वाढला. बक्षीस-समारंभ, लॅन्टर्न लेक्चर्स, शाळेतर्फे होणारे हळदकुंकवादि प्रसंग, व्हिजिटर्सची व्यवस्था, सुताचा वर्ग, शिवणकला व शारीरिक खेळां-कडे खर्च होणारा शाळेच्या वेळाखेरीजचा वेळ, कलाकुसरीचीं प्रद-र्शनें, खेळांचे सामने वगैरेंत ती अगदीं दंग होती. तिला कामाची व अध्यापनाची खरीखुरी हौस होती; म्हणून बिगारीनें कामाची विल्हे-वाट न लावतां ती आपलें सगळें तनमनधन अर्पण करून नोकरी बजावीत होती. गृहकृत्याकरितां एक बाईच तिनें ठेविली होती. 'ठेवूं नको' असें तरी कमलाकर सांगणार कसा ? आपल्या पैशांतून ती पैसे देणार होती ना ! हाच तर वरचढपणा त्याला सहन होई-नासा झाला होता.

हवापालट करायला म्हणून कमलाकराची आई आली होती. बरेच दिवस ती आजारी होती म्हणून कमलाकरानेंच तिला बोलावून घेतलें होतें. पहिल्यापहिल्यानें तर पद्मेला कुठें ठेऊं न् कुठें सांठवूं असें तिला होऊन गेलें. जिकडून तिकडून 'सूनबाई फारच गुणवान् आहे हं...' अशीं गौरवपर वाक्यें ऐकून तिला आपल्या मुलाच्या भाग्याबद्दल धन्यधन्य वाटलें. वरचेवर ती मुलापाशीं सुनेचे गुणानुवाद वर्णन करूं लागली.

रानईतल्या जळत्या वातीला तेलाचा पुरवठा असला की ती जळत राहते. कमलाकराच्या मनांत उद्विग्नतेची ज्योत तेवत रहायला हें एक कारण मिळालें होतें; पण तोंड दाबून बुक्क्यांचा मार म्हणतात तशा-पैकीं त्याला आईच्या स्तुतीला अनमानही करणें अशक्य होतें. मनां-तून मात्र त्याला आपण पत्नीहून हीन, नालायक ही भावना तीव्रतेनें जाणवत होती.

× × ×

" कमा, अजून बाजाची पेटी नाहीं घेतलीस तूं ! " कौतुकानें आई मुलाला विचारीत होती. " सूनबाईला पेटी छान येते— घे आतां— दोघंजणं मिळवितां; काय झालं ! "

" हूं— घेऊं आतां सवड झाली म्हणजे. आई, किनई मिळणारे सारे पैसे लागतातच. विम्याचे हप्ते आहेत; मासिकें घ्यायला हवींत; मित्र–मैत्रिणी येणार; सगळं सगळं पैशाचं आहे— तुला वाटतं शिल्लक राहाते, पण नाहीं— तसं नाहीं. " मनमोकळेपणानें कमला-कर म्हणाले. " अन् शिवाय पायपेटीला अगदीं कमी म्हटलं तर शंभर रुपये तरी हवेत. उगीच रद्दी घेण्यांत काय अर्थ आहे ! "

" सुनबाईजवळ आहेत शंभर रुपये— मला म्हणाली ती—"

" होय का ! मला नव्हतं ठाऊक ! शिल्लक असली तर घ्यावी पेटी. मजजवळ नव्हते पैसे, म्हणून मागनं घेऊं म्हणालों मी. " त्याच्या चेहऱ्यावर व आवाजांत पूर्ववत् औदासीन्य खेळूं लागलें. आईसाहे-बांच्या अंगीं सूक्ष्म निरीक्षणशक्तीचा अभाव असल्यानें तें त्यांच्या

त्यांनींमनींसुद्धां आलें नाहीं.

\+ \+ \+

आईसाहेबांनींच हेक्यानें शेवटीं पेटी आणली. तोंडानें मात्र त्या म्हणत— " मुलीला हौस आहे— एकदां पोराबाळांचा व्याप लागला कीं मुळीं देखील फावायचं नाहीं. आतां थोडासा सुटवंगपणा आहे, तोंवर घेऊं दे हौस पुरवून..."

पद्मावतीला खरोखरच आनंद झाला. आपण श्रेष्ठ या भावनेनें नव्हे पण कधींची पेटीची हौस पूर्ण झाली म्हणून. कमलाकर जास्तच चिडखोर बनत चालला. ती पेटी त्याच्या उद्विग्नतेचें मूळ बनली. पेटीचे सूर आपली निर्धनता ओरडून सांगत आहेत असेंच त्याला वाटे. त्याचें उरलें सुरलें गृहसौख्य नष्ट होत चाललें. लोक म्हणत, " कमलाकर, तुम्ही फार भाग्यवान्! कलावती, सुंदर, हुशार आणि मिळवती बायको तुम्हांला मिळाली आहे. पेटीही वाजवतात म्हणे उत्तम. आम्हांला तरी ऐकवा एकदां त्यांचं पेटीवादन... ! "

मनांतला संताप मनांतच आवरीत तो कष्टानें स्मितवदन करी आणि म्हणे, " हो, हो, नेऊं कीं. तुम्हांला साऱ्यांना एकदां पार्टीच देऊं..." आंतून त्याचें अंतःकरण ओसाड बनत होतें. कांहींतरी कसलीतरी उणीव आहे, अशी रुखरुख त्याला लागे. उणीव कोणती त्याचें उत्तर मात्र त्याला सुचत नव्हतें.

× × ×

हवापालट आईंना मानवली नाहीं. हार्टडिसीजचें त्यांना दुखणें

होतें. पुनः अधून मधून छाती धडधडूं लागे आणि त्या व्याकूळ होत.

एके दिवशीं त्यांच्या छातींत जोरजोरानें धडधडूं लागलें. बरीच धांवपळ झाली आणि डॉक्टर वगैरे येऊन सर्व स्थिरस्थावर झालें. नंतर त्या म्हणाल्या, " कमा, मी जातें आपली. माझ्यापासून तुम्हांला निष्कारण त्रास. तुम्ही उद्योगाचीं माणसं. सूनबाई तुझ्यासारखीच ! एखाद दिवशीं दुपारींच कांहीं म्हणतां कांहीं झालं तर हाक तरी कुणाला मारायची ? बाई ती बाई— गडी तो गडीच—पण घरचं माणूस हवं..." चमत्कारिक नजरेनें कमलाकरानें पत्नीकडे पाहिलें. पेपर तपासण्यांत ती गढून गेली होती.

" बरें आहे, करतों कांहीं तरी व्यवस्था, " असें पुटपुटत तो तेथून उठला.

" मग तुला थोडे दिवस रजा घेतां येईल का ? बिनपगारी देखील चालेल. " त्यानें मनाचा निश्चय करून विचारलें. " पद्मे, आई थोडेच दिवस राहील. तेवढ्यांत तूं थोडी काढ रजा— मीही बघतों मिळाली तर... "

" पण आत्तां मिळणार नाहीं. " तांबड्या पेन्सिलीनें एका बुकांत खूण करीत तिनें उत्तर दिलें. " परीक्षा जवळ आल्या आहेत न् मागासलेले अभ्यास भरून काढलेच पाहिजेत. एकही दिवस फुकट जाऊन उपयोगी नाहीं. नाइलाज आहे माझा... "

तो जास्त बोलला नाहीं. संतापातिरेकानें त्याच्या नेत्रांतून अग्नि-स्फुल्लिंग बाहेर पडूं लागले. पण तिकडे पहायला तिला वेळ नव्हता.

त्यानें एक आठवड्याची ' सिक् ' रजा काढली. दुसरे दिवशीं त्याच्या आईची तब्येत बरीच बिघडली. तिला जेवणापैकीं एकही जिन्नस आवडला नाहीं. बोलून चालून मोलाची बाई ! ती थोडीच नीटनेटकं, सुग्रणपणानं न् लक्षपूर्वक करणार ! तेव्हां साहजिकच आपल्या सुनेनं करून घालावं अशी म्हातारीनं इच्छा प्रदर्शित केली.

" वेड आहे तुला आई ! जन्मभर आमच्या नशिबीं हेंच अन्न आहे. मला मोठा पश्चात्ताप व्हायला लागला आहे. एवढी नाकाहून मोतीं जड अशी शिकलेली मिळवती बायको कशाला करावी मी ! माझीच चूक आहे. "

" काय झालं रे कमा, एवढं त्राग्यानं बोलायला ! चांगले तुझ्या बरोबरीनं पैसे मिळविते आहे. मग तुझं काय बिघडलं ! " आई-साहेबांनीं प्रश्न केला.

" आई, कसं सांगूं तुला म्हणजे माझं म्हणणं समजेल !" अंतः-करणपूर्वक तळमळीनें कमलाकरपंत सांगूं लागले. " बायको शिक-लेली असली म्हणजे तो मनुष्य फार सुखी अशी माझी कल्पना होती ती फार चूक आहेसं वाटूं लागलं आहे. आतां ती आमची नाहीं. नोकरीची ताबेदार ! माझ्याबद्दल तिला कांहींच आदर नाहीं. कारण तिच्या दृष्टीनें माझी योग्यता खरंच कमी आहे तिच्याहून ! अन् हीच गोष्ट रात्रंदिवस माझ्या हृदयाला शल्याप्रमाणें बोंचत आहे. इतर अनेक कर्तव्यें मागें असल्यानें गृहिणीचीं कर्तव्यें करायला तिला वेळच नाहीं. आफिसांतून मी दमून भागून येतों पण घरीं ती कधींच नसते. सैंपाकीणबाई देईल तसला पांचट चहा घ्यावा न् चालतं

व्हावं ! मी घेऊन द्यायला असमर्थ अशा जिनसा ती आपल्या पगारां-तून आणते. माझा अपमानच नव्हे का हा ! मशीन, पेटी वगैरे गोष्टी माझ्या अपमानाच्या साक्षीच आहेत. ”

आईचेही डोळे पाण्यानें भरले. “ बाळा मला वाटलं तूं सुखांत असशील...” तिचे हे प्रेमळ उद्गार ऐकून कमलाकरपंतांचे डोळेही डबडबले. साश्रु नयनांनीं ते म्हणाले—

“ आई, तुझ्यापाशीं सांगून टाकतों. मनाचा कोंडमारा आतां सहन होत नाहीं. आई, दोन शब्द बोलूं म्हटलं तर पेपर्स, नोट-बुक्स, वह्या, बुकं, वगैरेपुढें सुचेल तर ना ! न् वेळही पाहिजे. एकादा मास्तर सोबतीला आहे यापलीकडे आतां माझ्या भावना जातच नाहींत. काय करूं ? बायको म्हणून लोकांचें जें प्रेममय सौख्य असतें, प्रत्येक गोष्टींत परस्परांबद्दल जी प्रेममय भावना असते, तिची तिला जाणीवसुद्धां नाहीं. कर्तव्य, कर्तव्य ! कर्तव्यापुढें प्रेमबीम सब् झूट आहे. अजून मी तृषार्त आहें. मोकळेपणीं बोलणं, बसणं, विनोद, वादविवाद वगैरेंत समानशीलत्वाचं सुख मिळावं म्हणून माझा बी. ए. बायको करण्याचा अट्टाहास होता. त्याचा परिणाम असा होईल ही कल्पना देखील मला नव्हती. आतां वाटतं, एखादी अडाणी बायको असती तरी बरं ! पती हेंच दैवत मानून तिनं मला जिवापाड सुख दिलं असतं...” उद्वेगभरानें त्यांनीं कपाळाला हात लावला आणि म्हटलें, “ आई, लोकांना दरमहा शंभर रुपये दिसतात पण नष्टवत् गृहसौख्य दिसतं कां ! माझं जरी डोकं दुखलं, ताप आला, तरी तिला रजा मिळत नाहीं !!! ”

" मग कमा, " त्याच्या पाठीवरून हात फिरवून आईसाहेबांनी हळूच सुचविलें-- " अजुनी एखादी अडाणी मुलगी बघून तुझा मोडकळीस आलेला संसार दुरुस्त करशील का ? दोन दोन बायका असतात पुष्कळांना. हो, जिथं सुख नाहीं, तिथं पैशाला काय चाटायचं आहे ? "

" नका, नका, असं भलतंसलतं मनांत आणूं नका. माझी चूक नीट कळली मला. " सद्गदित स्वरांत एकदम तेथें येऊन पद्मा म्हणाली.

" तूं लौकर कशी आलीस ? " त्यानें आश्चर्यानें विचारलें.

" माजी हेडमास्तरीण मेल्याची तार आली व साडेबाराला शाळेला सुट्टी देऊन आलें. अन् क्षमा असावी—बाहेरून सारं बोलणं ऐकलं मी— ! पत्नीचं प्रथम कर्तव्य जनताजनार्दनाची सेवा नसून पतिसेवा हेंच आहे हें मला नीट कळलं आज. आजपर्यंत नोकरी-मुळं आपल्याकडे दुर्लक्ष झालं, आपल्याला त्रास दिला, त्या नोक-रीचा मी उद्यांच राजीनामा देणार आहें. पैशाला खरंच काय करा-यचं आहे ? माझ्या चुकीची क्षमा... झालं गेलं विसरून उदार मनानं माझे अपराध पोटांत घ्यावे... " एवढे शब्द कसेबसे पद्मा-वतीनें उच्चारले. डोळ्यांतून अश्रू भराभरा ओघळत होते. आपण कितीही शाळेंत प्रिय असलों तरी पतिसेवा केली नाहीं तर आपलें जिणें व्यर्थ आहे या कल्पनेनें तिला फारच भीति वाटली.

" अग हें काय ? डोळे पूस पाहूं आधीं ! कमाला सुख द्यायचा प्रयत्न कर. तूं शहाणीच आहेस—... " आईसाहेब म्हणाल्या.

" तुझ्यासारखी सद्गुणी पत्नी जवळ असतांना दुसरी अडाणी

बायको करीन ही भीति खरंच कां तुला अजून वाटते आहे ?" कमलाकरानें स्मितमुद्रेनें विचारलें.

लाजून ती खालीं पाहूं लागली. हवें होतें तें कमलाकरास मिळालें. तोही प्रफुल्लित अंतःकरणानें तिजकडे पहात होता.

दुसरे दिवशीं पद्मेनें कामाचा राजीनामा दिला.



# शाप

" दादा ! "

त्या शांत वातावरणांत ही हांक निनादित झाली. टेबलावरील कागदांच्या पर्वतप्राय ढिगांतून दादासाहेबांनीं डोकें वर उचललें व भावनाशून्य नजरेनें यमुताईकडे पाहिलें.

" दादा, आलं का कांहीं पत्र आज ? " तिच्या शब्दाशब्दांतून मनाची व्याकुलता उमटत होती. तिचा तो कातर सकंप आवाज ऐकून आधींच सुन्न झालेल्या दादासाहेबांच्या चेहऱ्यावर अधिकच विपण्णता चढली.

" होय— आलं आहे ... हें पहा ... वाच ..." तुटक तुटक शब्दांनीं एक वाक्य पुरें करून त्यांनीं समोरच्या भिंतीकडे आपली शून्य नजर लाविली. समोरच एका हंसतमुख व्यक्तीचा कॅबिनेट साईजचा फोटो त्यांना दिसला. एकाग्र नजरेनें ते तिकडे पाहूं लागले.

यमुताईचें लक्ष त्यांच्या खिन्न मुद्रेकडे नव्हतें. हातांतल्या फाड-लेल्या लिफाफ्यांतून दोन बोटांच्या चिमटींत धरून एक लहानसा कागद तिनें बाहेर काढला. तो वाचतांना त्यांतला शब्दन्‌शब्द बाणाप्रमाणें तिच्या हृदयाला विद्ध करीत गेला.

" ती० दादासाहेब यांस—

सा. न. आपलें पत्र पोहोंचलें. पूर्ण विचारांतीं दुसऱ्या लग्नाचा माझा ठाम निश्चय झाला आहे. तेव्हां आपल्या कन्येला इकडे पोंचती

करण्याची तसदी घेतल्यास तो आपल्याला निष्फळ त्रास होणार आहे. असें कां, असें तुमच्यासारखे लोक विचारणारच ! त्याला उत्तर हेंच कीं, माझ्या मर्जीविरुद्ध वाटेल तसली बायको,—अशिक्षित, ओल्ड स्टाइलिश व ओबडधोबड विचारांची एक चालतीबोलती पुतळी तुम्हीं सर्वांनीं जुलमानें माझ्या गळ्यांत बांधली. या अन्यायाबद्दल यथाशक्ति तुम्हांला प्रायश्चित्त मिळालेंच पाहिजे ! जशास तसें ! माझ्यासारख्या धडाडीच्या माणसाला असली दुबळ्या कोत्या विचारांची लग्नाची बेडी मुळींच नको आहे. अधिक लिहून आपल्या तत्त्वज्ञानी विचारी बुद्धीला शीण कशाला देऊं ? हें शेवटचेंच पत्र व यापुढें आपसांतील आपल्या पत्रव्यवहाराला पूर्ण विराम द्यावा—हे विनंती.

आपला,

गजानन पळपुटे.

पत्र वाचून होतांच यमुताईच्या हातून पत्र गळून पडलें. आपल्या सभोंवारच्या वस्तु– दादा, स्वतः आपण, वगैरे– हळुहळू स्थानभ्रष्ट होत होत गरगर फिरूं लागल्या असा तिला भास झाला. लटपटत्या हातांनीं शेजारच्या कोचाचा आधार घेऊन ती मट्कन् खालीं बसली. बिचारे दादासाहेब ! त्या फोटोवरली आपली अविचल दृष्टि काढून ते यमुताईजवळ येऊन मृदुस्वरांत म्हणाले– " बाळ, झालं तें झालं ! जाऊं दे; नाहीं तरी असल्या मोकाट विचाराच्या अर्धवटाबरोबर तुला सुख लागलं नसतंच ! ऊठ; जरा तुझें डोकं शांत झालं कीं, आपण नीट विचार करूं... "

यमुताईनें चटकन् अश्रू पुसले. रडून काय होणार ? “कुणाचं गेल्या जन्मीं वाईट चिंतलं असेल तशीं फळं मिळताहेत आतां ! दादा ! नाहींतर मी कुणाचंही या जन्मांत कांहीं वाईट चिंतलं होतं का ? ” हे शब्द उच्चारून दुःखीकष्टी यमुताई घरांत गेली. दादासाहेब पुनः कागदांत डोकें खुपसून बसले. मध्येंच एकदां त्यांनीं डोकें उचलून समोरच्या फोटोकडे पाहिलें. ते विचारांत तन्मय झाले. लागोपाठ अनेक दृश्यें– त्यांच्या पूर्व आयुष्यांत घडलेलीं– त्यांच्या नजरेखालून जाऊं लागलीं.

× × ×

वीस वर्षांपूर्वींचे दादासाहेब म्हणजे नवज्वानीचें रक्त ज्यांच्या नसानसांतून सळसळत होतें असे कॉलेजांतले बोलके सुधारक होते. त्यांच्यासारख्याच मित्रांनीं काढलेल्या डिबेटिंग क्लबचें नेतृत्व व वक्तृत्व त्यांच्याकडे होतें. त्यांच्या बोलण्याचा प्यारा विषय म्हणजे ‘हुंडा’ ! हुंडा घेणें कसें नीचपणाचें आहे व त्यावरून आपली लायकी आपणच कशी मोजून घेतों वगैरे मोठ्या सुंदर जोरदार भाषेंत व्याख्यानें देऊन त्यांनीं किंवा क्लबच्या कोणाही सभासदानें हुंडा घ्यावयाचा नाहीं अशा शपथा घेतल्या होत्या.

दादासाहेबांना लग्नाच्या आधींचें दृश्य दिसूं लागलें. “मी लग्न ठरवून गाढवपणा केला. तूं मोठया शहाणपणानं तें मोडून टाकून चारचौघांत मला मान खालीं घालायला लाव; आणखी विलायतेहून एखादी मडम आणून बिनहुंड्यानं लग्न कर ! हुंडा घेणं पाप आहे काय ? अन् माझ्या चौघी मुलींना दोन दोन हजार हुंडे दिले तेव्हां

नाहीं कुठें तूं हुंड्याविरुद्ध ओरड केलीस!" बाबा जणूं काय आतांही तावातावानें आरडून ओरडून बोलत आहेत असें वाटण्याइतके हे शब्द त्यांच्या कानांत घुमत होते. पुढल्या शब्दांची आठवण तर ते कधींच विसरले नव्हते. "लग्न मोडायचं असेल तर तूं माझा कोणी नव्हेस! माझी सारी इस्टेट धर्मादाय लिहून टाकतों. दमडीदेखील नको तुला मिळायला! आधीं घरांतून बाहेर जा न् मग लग्न कर. नाहींतर काय हवं तें कर!"

पंधरावीस हजारांच्या मालमत्तेवर लाथ मारण्याइतके दादासाहेब दुधखुळे नव्हते. मुकाट्यानें त्यांनीं कमुताईच्या माळेसाठीं मान वांकविली.

पण हा जुलमाचा रामराम होता. कमुताईकडे पाहून त्यांना अपमानाची आठवण होई व संतापानें ते धुमसूं लागत. उलट कॉलेजच्या कमनीय वातावरणांतील फॅशनेबल व प्रेमळ सुमित्रा मुळे हिच्या सहवासांत आनंदानें— स्वेच्छेनें त्यांचें मन गुरफटून जाई. आपलीं मतें कवडीमोल ठरवणारी, मित्रांत आपल्याला लांछन आणणारी कमुताईची मूर्ति दृष्टीस पडतांच ते अगदीं बिथरून जात. दूर कुठेंशी त्यांना नोकरी लागली. 'देवाजवळ एक डोळा मागावा व त्यानें दोन द्यावे' इतकें त्यांना बरें वाटलें. पत्नी परमुलखांत कशी न्यायची! या सबबीवर त्यांनीं तीन वर्षें एकट्यानेंच काढलीं. नंतर तीन महिन्यांची रजा घेऊन ते परत आले. त्यानंतरचें दृश्य त्यांना दिसूं लागलें.

आई पुराणाला, वडील ऑफीसांत, धाकटी भावंडेंही कुठें भातु-

कल्लीला गेलेली– आणि फक्त कमुताई व दादासाहेब घरांत ! ही सुसंधि कमुताईंनीं दवडली नाहीं. त्या दादासाहेबांच्या खोलींत जाऊन उभ्या राहिल्या.

" काय ! काम आहे...कांहीं ? " अडखळत दादासाहेब म्हणाले.

" होय ! असं विचारायचं आहे मला कीं, आपण असं तुसडे-पणानं कां वागतां ? माझ्या वडिलांनीं हुंडा दिला ही चूक माझी आहे का ? अन् असं वागून तरी बरेपणा मिळणार आहे का ? असल्या वागणुकीनें लोक मला प्रश्न विचारून विचारून बेजार करताहेत... कीं दुसराच कांहीं भलता नाद लागला आहे का म्हणून...न् मलाही वाटतं... ! " शब्दाशब्दाला लोण्याप्रमाणें विरघळूं लागणारें दादा-साहेबांचें मन शेवटलें वाक्य ऐकून बर्फाप्रमाणें घट्ट बनलें. तीव्र आवाजांत त्यांनीं विचारलें... " मी बाहेरख्याली आहें असं तुलाही वाटलं ना ? झालं तर... तसंच समज... " पत्नीबद्दल नुकतीच उद्भूत होणारी सहानुभूति शेवटच्या एकाच प्रखर वाक्यानें नष्ट होऊन गेली. समोरचेंच कसलेंसें पुस्तक उघडून त्यांत गर्क होऊन जाण्याचा त्यांनीं प्रयत्न केला.

आतां मात्र कमुताई संतापल्या. त्यांनीं तें पुस्तक ओढून बाजूला केलें व दादासाहेबांच्या कठोर दृष्टीकडे आपली निश्चल दृष्टी लावून विचारलें, " असा कानाडोळा न्... दुर्लक्ष मी करूं देणार नाहीं तुम्हांला ! लग्न झाल्यापासून चार वर्षे होत आलीं... काय असा मीं अपराध केला आहे कीं तुम्ही माझ्याशीं अगदीं परक्याप्रमाणें वागतां आहांत ते ! तुमची ही एखादी क्षुल्लक लहर असेल तरी माझ्या

साऱ्या जन्माच्या सुखदुःखाचा प्रश्न आहे तो ! तुम्हीं कितीही अनास्था दाखविलीत तरी मला निगरगट्टपणानं विचारलंच पाहिजे ! अजून तरी मला आपल्या सुखदुःखाची भागीदारीण करा. तुमच्यासाठीं माहेरचीं सारीं माणसं सोडून मी इकडे आलें ना ? तुम्हीही असं करायला लागलांत तर जाऊं तरी कुठें मी... ? ''

मागलें त्रिभुवन दादासाहेबांना आठवलें. समोरच वडिलांचा एन्लार्ज केलेला फोटो होता. वडिलांची ती चित्रमूर्ति अजूनही आपल्याला हिणवून जणूं विचारीत आहे... " आतां तरी मी करून दिलेल्या मुलीशीं संसार करशीलच कीं नाहीं... '' असा त्यांना भास झाला. समोरच एक कसलेंसें– तें मघाचेंच पुस्तक– पडलें होतें. त्याच्या आंतल्या उघड्या पानावर ' सुमित्रा मुळे ' हीं अक्षरें दिसत होतीं. कांहींतरी मनाचा ठाम निश्चय करून ते उत्तरले...

" माहेरीं परत जावं खुशाल ! '' कमुताईना हे शब्द इतके वर्मी लागले कीं, जर त्यांचें हृदय कांचेचें असतें तर एवढ्या आघातानें त्याचे शतशः तुकडे झाले असते.

" हेंच उत्तर शेवटचं—खरं समजूं ना मी ? ......'' पुनः एकदां त्यांनीं विचारलें. आशा वेडीच असते नाहीं का ? निराशेनें किती वेळां ढकलून दिलें तरी पुनः ती तेथेंच लुडबुडते !

या प्रश्नावर उत्तर देण्याची तसदी दादासाहेबांना घ्यायची आवश्यकता वाटली नाहीं. 'सुमित्रा मुळे' इच्या मालकीचें तें पुस्तक पुनः त्यांनीं उघडलें.

निःशब्द अपमान तीव्रतम कसा असतो हें कमुताईच्या पुनः अनु-

भवास आलें. पुनः एकदां त्यांनीं दादासाहेबांकडे नीट पाहिलें. जणूं कायमचा वियोग होण्यापूर्वी त्या त्यांना डोळे भरून पाहून घेत होत्या. जड हृदयानें त्यांनीं तेथून पाऊल काढलें.

× × ×

जणूं काय आतांही आपण तसेच उर्मटपणानें वागतों आहों असें वाटून त्यांनीं वर मान केली. गजाननराव पळपुस्यांचें तें पत्र मोठ्या डौलानें लिफाफ्यांतून किंचित् बाहेर डोकावून त्यांचेकडे उपहासानें पहात होतें! सहज तिकडे नजर जातांच त्यांना त्यांतली अर्धी ओळ दिसली—" जशास तसें ! "

" खरोखर जशास तसेंच झालें. पण फरक एवढाच कीं माझ्या ऐवजीं माझ्या यमूला शिक्षा—शापच म्हणा हवा तर—भोगावी लागली आहे... ! " पूर्व आयुष्याच्या त्यांच्या त्या बोलक्या चित्रपटांतील त्या व्यक्ती, ते प्रसंग, सर्व नाहींसे झाले. परंतु अजूनही दादासाहेब सुन्न तऱ्हेनें बसलेच होते.

" या जन्मीं मीं कुणाचं वाईट चिंतलं होतं का ! " हा यमूताईचा प्रश्न त्यांच्या कानांत पुनःपुन्हां प्रतिध्वनित होत होता. ते एकदम उठले. कोंपऱ्यांतल्या कपाटाशीं जाऊन शून्य चित्तानें त्यांनीं कसलासा विचार केला. आणि हळूच दार उघडलें. आंत सर्व कागदपत्र व्यवस्थित तऱ्हेनें मांडले होते, त्यांची त्यांनीं उचकाउचक करून एक लहानसा लिफाफा हातांत घेतला व ते टेबलाशीं येऊन बसले. त्यांनीं तो उघडला—

" दादासाहेब यांस--

जिथें अजिबात संबंध तुटला तेथें मायना तरी कशाला अन् एवढी भीड तरी कां म्हणून ! हेंच माझें शेवटचें पत्र आहे. मी मेल्यावरच हें पत्र तुमच्या हातांत पडावें अशी मी चांगली व्यवस्था करून ठेविली आहे. मला मानसिक म्हणा–शारीरिक म्हणा, क्षय झाला आहे. आणि आतां या आप्पलपोट्या ढोंगी जगांत उरलेले थोडेसे दिवस कसेबसे ढकलायचे आहेत.

मृत्यु हा सर्वांनाच आहे. पण माझा मृत्यु तुमच्याकडून झाला असें नाहीं तुम्हांला वाटत ? सुमित्रा मुळे हिच्याबरोबर आपला सुखाचा संसार चालला आहे. कुणीकडून तरी तुम्हीं सुखी असावें एवढीच माझ्या मनाची धांव असती तर माझें कवडीमोल जीवन आणखीही जगलें असतें—पण माझी महत्त्वाकांक्षा अशी कूपमंडूक वृत्तीची नव्हती. तुमच्या सहवासांत मीं पावन व्हावें व त्यामुळें तुम्ही सुखी व्हावें अशी माझी इच्छा होती. ' पुन्हा सासरीं धाडूं नये ' या वाक्याच्या कुऱ्हाडीनें आपण माझ्या मनाचे किती लचके तोडले ते......पण असूं दे. तुमच्यापुढें रडगाणें गाऊन उपयोग काय ! सर्व विश्वाचा स्वामी कांहीं तुमच्यासारखा लहरी नाहीं. त्या न्यायी ईश्वराजवळ लौकरच जाऊन मी न्याय मागणार आहें. एका गरीब निरपराध मुलीच्या जन्माचा खेळखंडोबा करण्याची तुमची लायकी तरी आहे काय ! नवऱ्यानें टाकलेल्या बायकोचें जीवन मातीमोल कसें होतें तें आज ना उद्यां–वीस वर्षांनीं कां होईना पण तुमच्या अनुभवास येईल–मग तुमचे डोळे उघडतील !

मीं हें अंतःस्फूर्तीनें लिहिलें आहे. एक अक्षरही त्यांत खोटें होणार नाहीं. अजूनही मी तुमचें मनन, स्तवन, ध्यान करीत असतें. त्या पुण्याईच्या जोरावरच माझा तुम्हांला हा शापच म्हणा हवातर—कीं आजपासून वीस वर्षांत केव्हां तरी आपल्या प्रेमाच्या माणसावर हाच प्रसंग येईल. तेव्हां माझी तुम्हांला पुरी जन्माची आठवण राहील. या पत्रानें उरले सुरले ऋणानुबंधाचे धागे मीं तोडून टाकून तुम्हांला मुक्त केलें आहे.

आपली,

कमला."

पत्र वाचून त्यांनीं वर पाहिलें. मघाचीच ओळ पुनः दिसली. " जशास तसें ! "

" तिचाच हा शाप यमुताईला नडला तर ?..."

विचारमग्न होऊन ते डोकें दाबून बसले.



# हरतालिका

" ठण्ण् ठण्ण् ! " टॉवरच्या घड्याळांत दोहोंचे ठोके ऐकून शांता एकदम चमकली. " काय ! दोन वाजले ! अन् एवढा वेळ मी एकटीच जागी आहें आज ! " असें पुटपुटत ती अंथरुणावर उठून बसली. तिनें आसपास पाहिलें. दूर कोपऱ्यांत 'प्रभाकर' कंदील बारीक मिणमिण जळत होता. त्याच्या मिणमिणीत उजेडांत सर्व वस्तूंच्या सावल्या अगदीं काळ्याकुट्ट अन् लांबलचक पडल्या होत्या. पलीकडे तिचे वडील—अण्णा निजले होते. त्यांची सावली तर इतकी मोठी अन् कसलीशीच पडली होती कीं शांताला मनांतून भीति वाटूं लागली. तशीच ती उठली. थंडी बरीच होती. धाकट्या भावंडांच्या अंगावरचें सरकलेलें गरम पांघरूण व्यवस्थेशीर घालून तीही पुन्हां अंथरुणावर पडली. पण तिला झोंप मात्र मुळींच लागेना. कशी लागणार ! सर्व आयुष्याच्या घडामोडीचा महत्त्वाचा प्रश्न जिथें तिच्या अगदीं मनाविरुद्ध निकालांत निघूं पहात होता, तेथें झोंप न आल्यास काय आश्चर्य ! पुन्हां ती विचारांत गढून गेली.

× ×

शांताचें वय अदमासें [redacted] वर्षांचें होतें. तिच्या पाठोपाठचीं अशीं चार भावंडें होतीं व एवढ्या साऱ्यांना टाकून त्यांची आई नुकतीच परलोकवासी झाली होती. शांताचें लग्न केव्हांच होऊन

जायचें, पण आई वारल्यावर घरांत कुणीच कर्तेसवरतें नसल्यानें तो प्रश्न किंचित् लांबणीवर पडला होता.

शांताच्या चार घरें पलीकडेच एका सुखवस्तु कुटुंबांतला एकुलता एक हुषार मुलगा शांताराम हा तिला सर्व दृष्टींनीं अनुरूप वर होता. वय, शिक्षण, रूप, सांपत्तिक स्थिती, अन् मुख्य म्हणजे दोघांचे स्वभाव यांचा उत्कृष्ट मेळ बसत होता. शांतारामाच्या घरचीं सर्व माणसें बरीचशीं नव्या मताचीं होतीं व त्याही दृष्टीनें त्यांना शांता पूर्ण पसंत होती. एवढंच नव्हे तर लहानपणापासून थोरांनीं चिडवून चिडवून परस्परांबद्दल भावी पतिपत्नीच्या नात्याच्या सौख्यमय कल्पना दोघांच्याही अंतःकरणांत इतक्या दृढमूल केल्या होत्या कीं आतां त्याला धक्का देणें शहाणपणाचें नव्हतें.

परंतु प्रत्यक्ष जेव्हां शांताच्या विवाहाचा प्रश्न उभा राहिला, तेव्हां पहिल्यानें शांतारामाबद्दलचा विचार साहजिकच शांताच्या वडिलांच्या मनांत आला व ते जुन्या तऱ्हेचे गृहस्थ असल्यानें त्यांनीं शांतारामाची पत्रिका आणवून शांताच्या टिपणाशीं ताडून पाहिली—तों काय एकनाड ! !

झालें ! इतका सर्व तऱ्हेनें सुयोग्य वर त्यांच्या दृष्टीनें एका क्षणांत नालायक ठरला ! व दुसरीं स्थळें हुडकण्यास सुरवात झाली. लौकरच मुंबईचे कोणसे 'अप्पासाहेब सोमण' हेडक्लार्क विवाहेच्छु आहेत अशी बातमी शांताच्या वडिलांना लागली. त्यांचें टिपण अण्णांनीं मागवून पाहिलें. तों छत्तीस गुण जमले ! लगेच तसें त्यांना कळवलें गेलें व मुलगी 'पहायलाही' आमंत्रण केलें गेलें.

हे हेडक्लार्क स्त्रीशिक्षणाच्या व हल्लींच्या सुधारक मंडळींच्या पूर्ण विरुद्ध होते. त्यांची प्रथम पत्नी नुकतीच स्वर्लोकीं निघून गेली होती व त्यांच्या सर्व मोडकळीस आलेल्या संसाराला आळा घालूं शकेल एवढी मोठी मुलगी त्यांना पाहिजे होती. मुलगी मोठी व शिवाय सुस्वरूप असल्यास शिक्षणाकडेही ते कानाडोळा करणार होते ! म्हणून शांता सुशिक्षित असूनही तिला ते दुसऱ्या दिवशीं पहायला येणार होते. आणि अजून तें शांतारामाला किंवा कुणालाच कळलें नव्हतें. मग त्याच्या आदले रात्रीं शांता अशी तळमळत होती हें बरोबरच होतें !

“ ज्या कुणीं ही टिपणाची भानगड काढली असेल त्याला आजपर्यंत आमच्यासारख्या अनुरूप वधूवरांचे लाखों शिव्याशाप मिळाले असतील ! अगदीं नाइलाज होऊन हात टेंकण्याइतकी ही बाब बिनतोड अन् बलवत्तर झालेली आहे. कुठं एकनाड तर कुठं एक गोत्र ! कुठं मंगळ कडक—कुठं राक्षसगण ! अशा या क्षुल्लक कारणांनीं कितीतरी लग्नं आजवर फिसकटलीं असतील ! अजूनही टिपणावर इतका अंध विश्वास दिसून यावा हें नवल नाहीं का ! या सुधारलेल्या जगांत बदलत्या काळाबरोबर अनेक जुन्या समजुती नष्ट झाल्या; पण ग्रहयोग व पत्रिका वगैरे पाहण्याची समजूत मात्र पूर्वीइतकीच जोमदार आहे ! बरं. ज्यांचे छत्तीस गुण जमतात त्यांचे तरी संसार हमखास सुखाचे होतात का ! मुळींच नाहीं ! संसारांत त्यांचं वर्तन सलोख्याऐवजीं उलट ३६ या आकड्याप्रमाणंच असलेलं आपण कितीतरी वेळां पाहातों. टिपणांत एकनाड

येईल हें आमच्या ध्यानींमनींसुद्धां नाहीं आलं. शांतारामाखेरीज दुसरीकडे कुठें छत्तीस गुण जमले तरीसुद्धां मला सुख होणं शक्य नाहीं. थोर मंडळींनीं तरी लहानपणापासून आम्हांला असं कां चिडवावं एकमेकांबद्दल ! म्हणूनच ना ह्या कल्पना आमच्या मनांत दृढ झाल्या ! काय करावं बरं ! उद्यां हे क्लार्क येतील. अन् समजा, त्यांनीं मला पसंत केलं तर ! तर...तर काय ! माझ्या इच्छेला कोण विचारणार आहे मग ! निमूट मला त्यांच्या गळ्यांत माळ घातली पाहिजे...पण छे... ! हें कधींही होणार नाहीं ! " इत्यादि विचार केवढा वेळ तरी शांताच्या गोंधळलेल्या डोक्यांत येत होते. अखेर पहांटे पहांटे तिचा जरा डोळा लागला.

लौकरच ती उठली. आज हरतालिका होती. तिला उपास होता. सकाळीं काम लौकर आवरून शेजारच्या सत्यंकाकूंच्या घरीं सार्वजनिक हरतालिका–पूजन होतें तेथें ती गेली. चौरंगावर वाळूचीं दोन शिवलिंगें मांडलीं होतीं व पार्वती व तिची सखी अशा दोन मातीच्या प्रतिमा त्यासमोर मांडल्या होत्या. भटजी आले, त्यांनीं षोडशोपचारें पूजा सांगितली, त्याप्रमाणें सर्व बायकांनीं ती पार पाडली. शांता कुमारिका म्हणून तिनें नुसतें हळदकुंकू अन् पानफूल वाहिलें. मग भटजींनीं हरतालिकाख्यान सांगितलें. मुलांचीं रडणीं, बायकांची त्याच वेळीं घरगुती गप्पा मारण्याची लागलेली लहर, जमलेल्या पोरीबाळींचा कलकलाट, अन् घरच्या यजमानीणबाईची त्याच वेळेस हळदीकुंकू देण्याची धांदल, —यांमुळें पोथीकडे फारसें कुणाचेंच लक्ष नव्हतें. खुद्द भटजींचें लक्षसुद्धां पोथी सांगण्यापेक्षां

'दक्षिणा कोण किती ठेवतं' याकडेच होतें व केवळ एक कर्तव्य म्हणून कसेंबसें पार पाडायचें याच दृष्टीनें ते पोथी सांगत होते. आमच्या शांताबाईनीं मात्र पोथी लक्ष्यपूर्वक ऐकली. अन् आपणास पडलेलें विचारांचें कोडें एकदम सुटलें असेंच तिला वाटलें.

खरोखरच हरतालिकेची कथा अत्यंत उद्बोधक आहे. उपवर पार्वतीकरितां हिमालयानें (तिचे वडील) श्रीविष्णूचें स्थळ ठरविलें. ह्या स्थळांत कोणतीही न्यूनता नव्हती. परंतु ह्यापूर्वींच पार्वतीनें शंकरास मनानें पति म्हणून वरलें होतें हें तिनें वडिलांस स्पष्ट कळविलें. पण शंकर निर्धन म्हणून हिमालयास पसंत पडले नाहींत व त्यानें श्रीविष्णूलाच मुलगी द्यायचा निश्चय केला. हें पार्वतीस समजतांच तिनें बरोबर फक्त एक सखी घेऊन गृहत्याग केला व घोर अरण्यांत जाऊन श्रीशंकराची मनोभावें पूजा केली. तिच्या खऱ्याखुऱ्या मानसिक आराधनेनें श्रीशंकर संतुष्ट झाले व त्यांनीं इच्छित वर दिला. एवढ्यांत मुलीचा शोध करीत हिमालयही तेथें आला, व पार्वतीचा विलक्षण निर्धार पाहून आपला हेका सोडून सन्मानानें त्यानें श्रीशंकरांस कन्या अर्पण केली. असा या कथेचा थोडक्यांत सारांश आहे.

शांताला वाटलें, "अगदीं आपल्या स्थितींतल्या मुलींना मार्गदर्शक असं हें आख्यान आहे. वडील जुलमानं एकाद्याशीं मुलीचा विवाह तिच्या मनाविरुद्ध करूं लागले तर तिनं गप्प न बसतां त्याचा शक्य तेवढा प्रतिकार करावा. साध्या उपायांनीं त्यांच्या मनावर परिणाम न झाल्यास वेळप्रसंगीं गृहत्याग सुद्धां करावा; पण

विवाहाच्या बाबतींत होणारा जुलूम बिलकूल सहन करूं नये हें तत्त्व प्रत्यक्ष आदिमाया पार्वती माझ्यासारख्या उपवर मुलींना स्वतांच्या उदाहरणानं किती उत्कृष्ट पटवून देत आहे बरं!! त्या वेळचं पार्वतीचं बाणेदार वर्तन, दृढनिश्चय, संकटाविषयीं पूर्ण बेफिकीर वृत्ति, मनानं वरलेला पति मिळविण्याची उच्च महत्त्वाकांक्षा व त्या महत्त्वाकांक्षेच्या पूर्ततेसाठीं केलेला प्रतिकाराचा यथाशक्ति प्रयत्न, हें सर्व स्त्रियांच्या—अबला म्हणून वाटेल तो जुलूम निमूटपणं सहन करणाऱ्या हल्लींच्या हिंदु स्त्रियांच्या—मनावर ठसावं म्हणूनच त्या प्रसंगाचं—पार्वती सखीसह शिवपूजन करीत आहे अशा देखाव्याच—सर्वांनीं प्रतिमापूजन करावयाचं असतं. वास्तविक हें व्रत कुमारिकांचं— प्रौढ कुमारिकांचं आहे. त्यांनाच पार्वतीचा आदर्श नेत्रांसमोर पाहिजे. परंतु आम्ही नुसतं गंधफूल न् हळदकुंकू वाहायचं अन् ह्या लेकुरवाळ्या बायकांनीं मात्र शास्त्रोक्त पूजा करायची, असं कां म्हणून! त्यांना काय पार्वतीच्या लग्नाआधींच्या चरित्राचा उपयोग!”

विचारप्रवाहांत शांता इतकी तन्मय झाली होती कीं, पोथी संपून बायका घरीं जायला लागल्या हेंसुद्धां तिच्या ध्यानांत आलें नाहीं. शेवटीं सत्यंकाकू तिला कुंकू लावीत चेष्टेनें म्हणाल्या, “शांते, पोथी चांगली मनोभावानं ऐकली आहेस! आतां चांगला नवरा मिळेल हो! दरवर्षींचंच आख्यान; तें कांहीं नवीन थोडंच होतं एवढं तनमनधन देऊन ऐकायला! पण तूं आपली पोथी संपेपर्यंत इकडची नजर तिकडेसुद्धां वळवली नाहींस. याचंच मला आश्चर्य

वाटतंय् ! हें बघ, पण रात्रीं जागायला ये हं ! गाणीं चांगलीं छान म्हणून दाखव. तीं ऐकूं आम्ही लक्ष्य देऊन. नाहींतर पोथींत काय ऐकायचंय् नवीन ! " या शब्दांनीं ती ओशाळली. पण जगन्मातेच्या चरित्रश्रवणानें आपल्याला कोणता दिव्य संदेश मिळाला आहे याचीं कल्पनासुद्धां सत्यंकाकूंना नसेल हें तिच्या मनांत आल्या-वांचून राहिलें नाहीं.

मनोभावानें पार्वतीला वंदन करून ती घरीं आली.

× × ×

जेवतांना अण्णा व काका यांच्या आपसांतील बोलण्यावरून सोमण हेडक्लार्क तिला बघायला दुपारीं चाराला येणार असें तिला कळलें. पुन्हां तिच्या मनाची चलबिचल होऊं लागली. पण नंतर तिला सकाळच्या आख्यानाची आठवण झाली व धीर आला. लौकर लौकर फराळ व काम उरकून ती माडीवर एकीकडे निवांत जागीं जाऊन बसली. कागद, दौत, टांक एवढी सामुग्री घेऊन तिनें भराभर कांहींतरी लिहायला सुरवात केली. कागदामागून कागद लागोपाठ लिहिले जाऊं लागले. मधेंच एकदोनदां कागद फाडलेही गेले. नंतर आपलें सर्व लिखाण एकवार तिनें वाचून पाहिलें व पसंतीचें हास्य तिच्या सुंदर चेहऱ्यावर उमटलें. एका पाकिटांत ते सर्व कागद घालून तें पाकीट तिनें बुकांच्या कपाटांत ठेविलें व नंतर ती पुढील उद्योगास लागली. घरांत दुसरें कुणीच बायकोमनुष्य नसल्यानें मनांत नसतांनाही तिनेंच चहाची व फोड-

णीचे पोहे व शंकरपाळे अशी उपहाराचीही जय्यत तयारी करून ठेवली.

सकाळपासून विचार करकरून प्रतिकाराचा एक सोपासा मार्ग--एक छानदार युक्ती तिला सुचली होती. त्याचेंच ती अवलंबन करणार होती. त्यांत वडिलांचा व काकांचा आपणावर चांगलाच रोष होणार अशी तिची खात्री होतीच. पण हा आपल्या आयुष्याचा प्रश्न आहे, या वेळीं कुणाच्याही रागालोभाकडे लक्ष्य दिल्यास आपलें जन्माचें नुकसान होण्याचा संभव आहे तें टाळण्यासाठीं त्यांचा रोष झाला तरी चालेल असेंच पूर्ण विचारांतीं तिला वाटलें.

हळुहळू चार वाजायला आले. तीन वाजल्यापासूनच लौकर आटोपण्याबद्दल अण्णा तिला एकसारख्या सूचना देत होते. "अप्पासाहेब एका मित्राकडे उतरले आहेत, आज साडेचाराच्या गाडीला लगेच परत जाणार आहेत ते. फक्त पंधरा मिनिटंच ते इथं थांबूं शकतील. मी जातों आतां त्यांना बोलवायला. आधण तयार ठेव हं. ते आले कीं ताबडतोब चहा झालाच पाहिजे. त्यांचा खोळंबा होऊं द्यायचा नाहीं. शंकरपाळे, फोडणीचे पोहेबिहे सारं झालंच आहे ना? मी येईपर्यंत तूं कोरं नेस. ती मोठ्या काठाची चंद्रकळा नेस अन् कुंकूही बरंच मोठं लाव... हो! ते जुन्या चालीचे गृहस्थ,--मग आपणही जुनाच थाट ठेवावा. आज तुझी आई असती तर इतकं बारीक सारीक मला सांगावं लागलं नसतं! बऽऽरं! जातों तर!" वगैरे वगैरे बजावून अण्णा सोमणांना बोलवायला गेले. शांतानें पुन्हां पांच मिनिटें विचार केला व आपला

निश्चय कायम केला. आपल्याशींच ती समाधानानें हंसली आणि तिनें पोषाख करायला सुरुवात केली. प्रथम तिनें वेणी घातली. तिचा रोजचा सरळ भांग व अगदीं साधे केंस असत; पण आज मुद्दाम वांकडा भांग पाडून तिनें अगदीं ऐटबाज फुग्यांची केश-रचना केली. एवढेंच नव्हे, तर रोजच्या साध्या अंबाड्याऐवजीं फॅशने-बल असें पिळाचें चक्कर घातलें. कुंकू कोरून कोरून अगदीं बारीकशी टिकली लावली. खणाची साधी चोळी सोडून परीट घडीचा फॅन्सी ब्लाऊज घातला व अण्णांनीं नुकतेंच हौसेनें तिला एक तलम गुलाबी पातळ आणलें होतें तें नेसून खांद्यावर एका मैत्रिणीनें दिलेली सुंदरशी खड्यांची पिन्ही अडकवून दिली ! एकंदरींत रोजची साधीसुधी शांता आज एकदम विलक्षणच फॅशनेबल बनली ! सर्व झाल्यावर तिनें एकदां आरशांत पाहिलें व रोजची शांता हीच का—असा तिचा तिलाच भ्रम पडला.

थोडक्याच वेळांत मंडळी आल्याची तिला चाहूल लागली व त्यापाठोपाट अण्णांनीं बाहेरूनच उच्चारलेलें "हं, आली हं मंडळी! चहा लौकर होऊं द्या हं शांताबाई!" हें वाक्य तिनें ऐकलें. पांचदहा मिनिटांतच शांता चहाचा ट्रे व उपहाराचें सामान घेऊन आली. अण्णांनीं कांहींसें बोलायला म्हणून तोंड उघडलें होतें तें तसेंच उघडलेलें राहिलें. —"रोजची हीच का शान्ता ? ' रोजच्यापेक्षां जुन्या तऱ्हेची वर्तणूक असूं दे ' म्हणून बजावलं असतांना मुद्दाम त्याविरुद्ध वर्तन करणारी ही आपली रोजची आज्ञाधारक शांताच आहे का ? काय म्हणून आज उद्धटपणानं हिनं माझी अवज्ञा केली ?

मी अमुक कर म्हटल्यावर निमूट नम्रपणानं माझी आज्ञा तत्परतेनं पाळणारी नेहमींची साधी शांता इतकी कशी आज अंतर्बाह्य बदलून गेली ?"

या विचारांबरोबर अण्णांचा संताप अनावर झाला. पण मंडळींच्या देखत काय बोलतात बिचारे ? मंडळीदेखील विस्मयानें तिच्याकडे पाहातच राहिली ! शेवटीं कसेंबसें आत्मसंयमन करून अण्णा म्हणाले, "बैस बाळ !" अप्पासाहेब व अण्णा दोन खुर्च्यांवर, तिसऱ्या खुर्चीवर काका, अन् चौथी खुर्ची रिकामीच होती. 'बैस' म्हणतांच बैठकीच्या कोंपऱ्यावर अपराध्याप्रमाणें खालीं गुडघ्यांत मान घालून मोठ्या मर्यादशीलपणानें जमिनीकडे नजर लावून बसायचें सोडून शांता सरळ रिकाम्या खुर्चीवर येऊन बसली. अण्णा एक अक्षरही बोलले नाहींत. संतप्त मुद्रेनें 'शांताला वेडबीड तर लागलं नाहीं ?' असाच ते विचार करीत होते. अप्पासाहेबांनाही तें बिलकूल पसंत नसल्याचें त्यांच्या कपाळावरील असंख्य आठ्यांवरून शांताच्या लक्षांत आलें. . कारण ती धीटपणानें व निर्भयतेनें खुशाल त्यांच्याकडे पाहात होती. तिची नेहमींची शालीनता आज कुठल्याकुठें लुप्त झाली होती.

'तुमचें नांव काय व तुम्हांला भाऊ किती ?' एवढेंच विचारून क्लार्कसाहेबांनीं आपली तपासणी पुरी केली व ते जायला निघाले. त्यांच्याबरोबर अण्णाही स्टेशनपर्यंत त्यांना पोंचवायला गेले व तेथें नम्र स्वरांत त्यांनीं 'पत्रानें काय तें कळवावें' अशी विनंती केली. त्याबरोबर एवढा वेळ धुमसत असलेल्या त्यांच्या क्रोधाग्नीनें पेट

घेतला व त्यांच्या मुखांतून पुढील संतत वाक्यें बाहेर पडूं लागलीं—
" मला जुन्या तऱ्हेची मुलगी पाहिजे हें पक्कं माहीत असून तुम्हीं मुद्दाम माझी अशी फजिती केलीत काय ? बोलून चालून एक क्लार्क मी. मला फॅशनेबल अन् आयडीयल बायको काय करायची आहे ? तिचे चोंचले पुरवायला पैसा आणूं कुठून मी ? पत्रानं मागून कशाला—आत्तांच सांगतों कीं मी एक गरीब मनुष्य, मला तुमची मुलगी करायची ऐपत नाहीं. पुन्हां मात्र कुणाला असं तोंडघशीं पाडूं नका म्हणजे झालं ! " असें तणतणत व फणफणत क्लार्कसाहेबांनीं आपलें मत कळविलें.

बिचारे अण्णा ! अपमानित व निराश मनानें अन् खिन्न हृदयानें परत आले. दुरूनच त्यांचीं जड पावलें पाहून शांताला कसेंसेंच वाटूं लागलें. आज आपण वडिलांना अत्यंत क्लेश दिले ह्या विचारानें तिला फारच वाईट वाटूं लागलें. माडीवर जाऊन ती पडून राहिली.

अण्णा खोलींत शिरतात तों त्यांना टेबलावरच एक भलें जाड पाकीट दिसलें. पाकिटावर त्यांचेंच नांव असून तें अक्षर शांताचें होतें. प्रथम त्यांनीं रागाच्या भरांत पत्र फोडलेंच नाहीं. पण आपली नेहमींची सालस शांता एवढी बेफाम कां बनली तें तरी पाहूं या या विचारानें त्यांनीं पाकीट फोडून वाचायला सुरवात केली.

" ती० अण्णा यांस—

कृतानेक—पण आपल्या जिव्हाळ्याच्या माणसाला आपलें खरेंखुरें मनोगत कळवितांना औपचारिक मायन्याची आवश्यकता काय ?

प्रिय अण्णा, पत्र वाचण्यापूर्वी तुम्ही माझ्यावर किती रागावलेले असाल याची कल्पनासुद्धां मला करवत नाहीं. कारण दुपारीं तुमच्या आज्ञेविरुद्ध आज मीं किती उद्धट वर्तन केलें आहे, ह्याची मला पुरी जाणीव असतां आपणांसमोर येऊन आपल्या क्रोधांत मी भर घालीत नाहीं. शिवाय माझ्या अमर्याद कृतीचें समर्थन आपल्या तोंडावर स्पष्ट रीतीनें करण्याचेंही मला धारिष्ट नाहीं. म्हणूनच पत्रानें खुलासेवार आपल्याला कळविण्याचा हा राजमार्ग मीं पतकरला आहे.

मला आपल्याला पुष्कळच सांगावयाचें आहे. माझ्या मनांतले विचार मोकळेपणानें आपणांस कळवितांना मर्यादेचें आक्रमण होण्याची मला धास्ती वाटते. तेव्हां प्रथमच पत्रांतील अधिक उण्या मजकुराबद्दल आपली मनःपूर्वक क्षमा मागून नंतरच पत्र लिहायला सुरवात करतें. आपला नेहमींचा प्रेमळपणा माझ्या पूर्ण परिचयाचा आहे व म्हणूनच माझें एकंदर म्हणणें आपल्याला समजल्यानंतर आपला हा राग कायम राहणार नाहीं अशी मला अपेक्षा करावीशी वाटते.

अण्णा ! मी एक प्रौढ कुमारी आहें. आपण इतके दिवस मला शिक्षणाचा लाभ करून दिला, त्यामुळें मला चांगलें-वाईट किंवा स्वतःचें हित-अनहित जाणण्यापुरती समंजस बुद्धि प्राप्त झाली आहे. व म्हणूनच माझे वेडेवांकडे विचार आपल्या कानावर घालण्याचें धाडस माझ्या हातून होत आहे. अण्णा, मुलीच्या विवाहाचा पूर्वीचा काळ असा होता कीं त्या-

वेळच्या उपवर कन्या म्हणजे अष्टवर्षा भवेत् कन्या ! अर्थात् वर-पसंतीच्या बाबतींत एवढ्या कोंवळ्या बालबुद्धीला पूर्वी महत्त्व नव्हतें यांत आश्चर्य मुळींच नाहीं. हल्लीं बदललेल्या काळाबरोबर उपवर मुलींची लग्नाची वयोमर्यादा वाढल्यानें त्या समंजस होऊन त्यांच्या मताला या बाबतींत काडीइतकी सुद्धां किंमत न देणें हा अन्याय नाहीं का ? पंधरासोळा वर्षें लालनपालन केलेल्या पोटच्या गोळ्या-ला—कन्येला तिच्या जन्माचा सोबती ठरवतांना मात्र शब्दानेंही विचारायचें नाहीं हा एक तऱ्हेचा निर्दयपणाच आहे ! आणि अशा वेळीं आपल्या वाटेल त्या वरयोजनेला आम्हीं निमूट मान वांक-वलीच पाहिजे ! नाहींतर लागलीच उद्धट...वगैरे विशेषणें मिळतात ! आजच पहा ना ? आजच्या एकूणएक गोष्टी माझ्या मनाविरुद्ध झाल्या व म्हणूनच मी प्रतिकाराचा एक मार्ग शोधून आचरणांत आणला. पण तेव्हांपासून आपण माझ्यावर किती संतप्त झालां आहांत ? परंतु मुली उपवर झाल्या कीं स्वाभिमान, आवड, महत्त्वाकांक्षा वगैरे मनोविकार त्यांना सोडतां येत नाहींत हें आपण लक्षांत घेतल्यास आपला राग थोडाबहूत तरी कमी होईल. मी आज भीड मर्यादा सोडून लिहावयाचें ठरविलेंच आहे. म्हणूनच मी स्पष्ट आपणांस कळवितें कीं केलें तर शांतारामांशींच लग्न करीन असा मीं मनःपूर्वक निश्चय केला आहे. मग एकनाड असो कीं गणगोत्र एक असो ! असे वाटेल तितके अडथळे असले तरी त्यांच्याशीं माझा संसार सुखाचा होईल. अन् दुसरीकडे कुठेंही केवळ 'टिपण किंवा छत्तीस गुण जमतात' एवढ्यासाठीं माझ्या मनाविरुद्ध तुम्हीं मला दिलेंत

तर मला कल्पांतींही सुख होणार नाहीं ! लहानपणापासूनच शांतारामांशीं माझें पत्नीचें भावी नातें जोडलें जाणार आहे याची आपण थोर माणसांनीं वेळोवेळीं तसली गोड चेष्टा करून आमच्या दोघांच्याही मनाला जाणीव करून दिली हेंही आपलें जरासें चुकलें नाहीं का ? बुद्धीवर बालपणीं होणारे संस्कार अत्यंत बलवत्तर असतात. मग तेव्हांपासून आमच्या मनांत ही कल्पना अत्यंत दृढ झाली यांत आम्हांला खास दोष देतां येत नाहीं !

आईचें व तुमचे छत्तीस गुण जमत होते हें मला माहित आहे. मग आपल्या लहान कच्च्याबच्च्यांना सोडून ऐन भरल्या संसारांतून आई अशी कां अकालीं निघून गेली ? हें, अण्णा, तुम्ही सांगाल काय ? तेव्हांच आपली टिपणावरची अंधश्रद्धा नष्ट व्हायला पाहिजे होती. आतां जुन्या कोणत्या रूढी एवढ्या चिकाटीनें पाळल्या जात आहेत कीं याच बाबतींत तुम्हीं आपला दुराग्रह चालवावा ? हल्लींच्या बदलत्या काळांत सर्वच गोष्टींना नवें वळण लागत असतांना, अशा पुष्कळच बाबतींत जुन्या माणसांनीं आपल्या पुराण कल्पना सोडून देऊन नव्या व इष्ट कल्पनांचा अंगीकार करण्यांतच शहाणपणा आहे हें मीं तुम्हांस शिकवायला नको.

शांतारामांनीं 'हुंडा भलताच पाहिजे' अगर मुलगी बी. ए., एम्. ए अशी पाहिजे, विलक्षण सुस्वरूप पाहिजे, वगैरे कठीण अटी घातल्या असत्या तरी तेथेंच मला द्यावयाची अशीही अट्टाहासाची विनंती मीं कधींही आपणांस केली नसती, किंवा त्या ठिकाणीं मला न दिल्याबद्दल मीं आपणांस दोष दिला नसता. परंतु सर्व तऱ्हेनें अनुकूलता असतांना

अगदीं भिनतोड अशी ही निरुपयोगी बाब काढून आपण हें लग्न मोडूं पाहतां, तरीसुद्धां नसत्या लज्जेनें गप्प बसून माझें जन्माचें अनहित मी करून घेऊं काय ? अशा वेळेला गप्प बसल्यानें जन्मभर रडण्याची वेळ आल्याचीं हवीं तेवढीं उदाहरणें मी आपणांस दाखवूं शकेन ! तेव्हां एवढें सर्व आपणांस कळवूनही आणखी इतर ठिकाणीं आपण मला 'दाखवाल' तर मीही आजच्याप्रमाणेंच सुचेल त्या रीतीनें विरोध केल्याशिवाय रहाणार नाहीं हेंही आपण लक्षांत ठेवावें.—पण असा अप्रिय प्रसंग पुन्हां मजवर आपण आणणार नाहीं अशी आशा आहे.

सोमणांच्या पत्रिकेशीं माझी पत्रिका उत्तम तऱ्हेनें जमते असें आपण म्हणालांत. पण ते स्त्रीशिक्षणाच्या विरुद्ध, ललितकला व नवी राहणी यांच्याही अत्यंत विरुद्ध. अन् मला ह्या सर्व गोष्टींची चांगली आवड आहे हेंही आपणांस ठाऊक आहे. मग टिप्पण अगदीं जमत असलें तरी देखील दोघांच्या स्वभावांत धडधडीत दिसणारा हा भयंकर विरोध मला केवळ टिपणाच्या जमाईनें सौख्य-प्रद होईल अशीच आपली अजूनही कल्पना आहे का ! टिप्पण पहाण्यांत मुद्धां आपल्या मुलीचें बरें व्हावें हीच सदिच्छा आपल्या मनांत होती हें मी नाकबूल करीत नाहीं. पण जर माझें खरेंच बरें व्हावें अशी आपली इच्छा असेल तर टिप्पणजमाईसारख्या मोडक्या-तोडक्या आधारावर वाटेल त्याच्याशीं माझी जन्माची सांगड न घालतां जेथें मनाचा मिलाफ योग्य तऱ्हेनें झाला आहे किंवा होऊं शकेल तेथेंच मला द्या.—त्यांतच आपल्या मुलीला सौख्य होईल.

आपणांला हरतालिकाख्यान माहीतच आहे. केवळ ह्याच कारणा-वरून वडिलांचा प्रतिकार करण्यासाठीं-जगन्माता पार्वती घोर अरण्यांत निघून गेली. मीं जर असा गृहत्याग केला तर या संकटांतून माझी सुटका होणें कठीण नाहीं. पण त्यांत तुम्हांला अन् मला दोघांनाही किती कमीपणा आहे ! शिवाय त्यामुळें तें पट्कर्णी होणार व तें केव्हांही इष्ट नाहीं. आणि सामोपचारानें वळण्याइतका तुमचा स्वभाव प्रेमळ असतांना मी मुद्दाम अशा निर्वाणीच्या अस्त्राचा कशाला उपयोग करूं ! आज हरतालिकापूजन मीं मनोभावानें केलें व पोथी नीट ऐकली; म्हणूनच मला हें धाष्टर्य झालें असेंच मला वाटतें.

माझ्या अजाण बुद्धीला सुचेल तसा मीं दुपारीं आपणांस विरोध केला, ह्याबद्दल अजूनही, अण्णा, तुमच्या आवडत्या शांतावर तुमचा राग आहेच का ! जर असेल तर-माझें सारें म्हणणें बाजूला ठेऊन केवळ तुमच्या इच्छेसाठीं, तुम्ही ठरवाल त्याच्याशीं मुकाट्यानें संसार करण्याची माझी तयारी आहे ! पण त्यांत आपल्या शांताला काडीचेंही सौख्य होणार नाहीं. केवळ कर्तव्य म्हणूनच तो तसला संसार साजरा होणार हें आपणांस माहीत असूनसुद्धां आपल्या हातून असा निष्ठुरपणा होईल का !

अधिक उणें लिहिल्याची आपल्या उद्धट शांताला माफी असावी.

आपली,

नेहमींचीच आज्ञाधारक,

**शांता.”**

हातांतील पत्र संपतांच अण्णांनीं वर पाहिलें. अश्रूंनीं भरल्या डोळ्यांनीं नेहमींच्या 'साध्याच पोषाखांत' शांता जवळच उभी राहून अण्णांच्या चर्येकडे पहात होती. ते आतां काय म्हणतात याबद्दल तिचा जीव धाकधूक होत होता.

हलुहलू अण्णा तिजजवळ गेले. पाठीवरून प्रेमळपणानें हात फिरवीत ते म्हणाले, " माझा टिप्पण पहाण्याच्या हेका मीं अगदीं सोडून दिला आहे, बरें का शांता ! वेळींच सांगितलंस हेंच बरं झालं बाळ ! " किंचित् थांबून ते पुढें म्हणाले– " हरतालिकेच्या आख्यानांत शेवटीं जसें पार्वतीच्या वडिलांनीं तिचें म्हणणें मान्य केलें, तसेंच मी देखील आपला हट्ट सोडून शांतारामाशींच तुझें लग्न व्हावें या सर्वांच्या इच्छेला मनापासून संमति देतों. हरतालिकेच्या आख्यानाची या सुधारलेल्या काळांत ही सुधारून वाढवलेली आवृत्ति झाली म्हणायची ! "

शेवटच्या कल्पनेनें अण्णांना हंसू आलें. त्यांच्या आवाजांत, दृष्टींत व स्पर्शांत नेहमींचेंच मार्दव व पितृवत्सलता शांताला आढळून आली. आनंदानें तिचें म्लान वदन एकदम गुलाबासारखें टवटवीत दिसूं लागलें !



# चिकित्सेखोर

" पुनः पुनः काय तेंच तेंच ! एकदां सांगितलें ना, मला त्या गोखल्यांच्या कमळीशीं लग्न कर्तव्य नाहीं म्हणून ! " हातांतील लठ्ठ पुस्तक टेबलावर आपटीत डॉक्टरसाहेब म्हणाले. त्यांच्या आवाजांत तिरस्कार व त्रासिकपणा यांचें समभाग मिश्रण झालें होतें.

जानकीकाकू यावर एकही शब्द बोलल्या नाहींत. गोखल्यांची कमळ आपली सून व्हावी अशी त्यांची कितीतरी दिवसांची इच्छा मुलगा अशी धुडकावून लावीत होता, तरीही त्यांना कांहीं बोलतां येत नव्हतें. बरोबरच आहे; मुलगा शिकूनसवरून शहाणा झाला म्हणजे त्याला अमुक कर, तमुक करूं नको वगैरे सांगावयाचा अधिकार ' आईला ' कुठला असायला !

विश्रामला डॉक्टर झाल्यास नुकतेच दोन महिने होत होते. लहानपणापासून गरिबींत दिवस काढून, आपल्या बुद्धिवैभवावरच विश्राम डॉक्टर होऊं शकला होता. इतके दिवस शिक्षणासाठीं थोपवून धरलेला विवाहाचा प्रश्न आतां विचारांत घ्यायला पाहिजेच होता. स्वतः विश्रामची इच्छा देखील लग्न लौकरच व्हावें अशी होती. परंतु जानकीकाकूंना पसंत असलेली कमल गोखले त्याला स्वतःला पसंत नव्हती. ती हुषार, गोरी, बांधेसूद होती. हुंडाही बराच मिळाला असता. पण तिचे दांत जरा पुढें होते ! काकूंना विश्राम इतका सौंदर्योपासक असेल अशी कल्पनाही नव्हती. मुलगी कुलशीलवान्, श्रीमंत, दहाजणी-

सारखी असली म्हणजे झालें,– एवढीच त्यांची सुनेबद्दल कल्पना असल्यानें वरचेवर त्या विश्रामजवळ कमळीबद्दल ‘ गोष्ट ’ काढून तिचें गुणवर्णन करीत व विश्रामला त्याचा राग येई. शेवटीं एक दिवस चिडून त्यानें तिच्याशीं लग्न कर्तव्य नसल्याचें स्पष्ट सांगितलें. बिचाऱ्या जानकीकाकू ! त्यांनीं गोखल्यांच्या कमळेचें नांवही पुन्हां काढलें नाहीं.

× × ×

पदवीधर तरुण डॉक्टर आणि अविवाहित ! ही महत्त्वाची गोष्ट पुष्कळांच्या ध्यानांत होती. पुष्कळजण आपल्या ‘ कन्येच्या कल्याणार्थ ’ विश्रामशीं मैत्री जोडूं पहात होते. लग्नाच्या बाजारांत विश्रामची किंमत खूपच चढली होती. त्यामुळें येईल त्या मुलीला धुडकावून देण्याचा विश्रामनें सपाटा चालविला होता. अमकी फार उंच म्हणून... तमकी शुभ्र गोरी नाहीं म्हणून... फलाणीचा चेहरा रडका म्हणून... कुणाचा पाय चालतांना समांतर पडत नाहीं म्हणून... तात्पर्य एवढेंच कीं, नाकारायला हवीं तेवढीं कारणें विश्रामला सांपडत होतीं. हो ! दोनचार मुली तरी नाकारल्याशिवाय लग्न करायचें म्हणजे काय ? आणि अशा प्राण्याला मनुष्य समजायचें तरी कसें ?

शेवटीं एक लावण्यलतिका विश्रामला अगदीं पसंत पडली. मुंबईची फॅशनेबल राहणी, सुगौर अंगकांती, घनदाट केशकलाप, हरिणासारखे डोळे,–मला वर्णन करायला प्रयत्न करून देखील जमत नाहीं ! काय करावें ? थोडक्यांत कल्पना करायची म्हणजे काल्पनिक

कोणत्याही कादंबरींतील नायिकेचें सर्व वर्णन चंपूताईंना –विश्रामची पत्नी– लागू पडत होतें !

विश्राम कसा होता तें मात्र मी सांगूं शकेन. तो दिसायला अगदींच ' हा ' होता. कृष्णवर्ण, वराचसा लठ्ठ, आणखी त्याचे दांतही पुढें होते; पण त्याची विद्वत्ता हा एक फारच मोठा गुण असल्यानें तो रूपाची उणीव सहज भरून काढण्यास समर्थ होता.

विश्राम व चंपूताई यांच्या लग्नाला दोन वर्षं होऊन गेलीं. विश्रामला मधून मधून चंपूताईंचा राग येऊं लागला. एकमेकांच्या स्वभावांतले गुणदोष आतां परस्परांच्या ध्यानांत येऊं लागले होते. विश्रामच्या मनांत चंपूताईंनीं नर्सिंग कोर्स घ्यावा असें होतें, तर चंपूताईंना त्या ' किळसवाण्या ' धंद्याच्या नुसत्या गोष्टीसुद्धां आवडत नसत ! उलट चंपूताईंना गायनवादनाची भयंकर आवड; पण विश्रामला त्याचा गंधही नव्हता. एकदां विश्राम एका अवघड केसची मोठ्या मजेदार तऱ्हेनें माहिती सांगत होता; परंतु चंपूताई त्याच वेळीं दुरून कोठून तरी ऐकूं येणाऱ्या गायनाचे मधुर आलाप ऐकण्यांतच गुंग झालेल्या होत्या. एवढेंच नव्हे तर " किती सुंदर गाणें होतें नाहीं ! " असेंही त्यांनीं विश्रामला विचारलें. हा आपला अपमान आहे असेंच विश्रामला वाटलें. तो मुकाट्यानें तेथून उठून गेला.

× + ×

गोखल्यांच्या कमळचें लौकरच लग्न झालें. पूर्वीच्या ओळखीवर विश्रामला लग्नचिठ्ठी आली. ती वाचीत असतां चंपुताईंनीं सहास्य

५

मुद्रेनें विचारलें, “ कुणाची लग्नचिठ्ठी ती ? ”

“ बाबांच्या स्नेह्याची मुलगी होती एक. वाच... ” चिठ्ठी चंपूताईकडे फेकीत विश्राम म्हणाला.

चहाची वेळ झाली होती. चिठ्ठी घेऊन चंपूताई आंत गेल्या. स्टोव्ह पेटवून त्यावर आधण ठेवून त्यांनीं चिठ्ठी वाचली.

“ अगबाई ! ” त्या एकदम चकित झाल्या. चहा नेऊन देतांना त्यांचे डोळे लाल बघून विश्रामनें कारण विचारलें; पण डोळ्यांत केर गेला असें सांगून त्यांनीं वेळ मारून नेली. विश्राम दवाखान्यांत गेला आणि चंपूताई आपल्या खोलींत येऊन बसल्या. दाराला आंतून कडी लावून त्यांनीं आपली ट्रंक उघडली. दागिन्यांच्या डब्यांत तळाशीं हात घालून त्यांनीं एक फोटो बाहेर काढिला. त्या फोटोकडे पहात त्या हळूच म्हणाल्या, “ अण्णा, आतां ही तुमची नुसती स्मृति जागृत ठेवायची ना ? आपण आजन्म अविवाहित राहणार होतां ना माझ्यासाठीं ! आणि आज ! आज ही कमल गोखले आपली विवाहित पत्नी होणार ! भाग्यवान विचारी ! बाबांनासुद्धां पैशाची किंमत जास्त वाटली ! मला कोणीं नुसतें विचारलेंही नाहीं माझ्या लग्नाबद्दल ! मी काय करूं, अण्णा ? असो, या जन्मीं नाहीं तर नाहीं... पुढल्या जन्मीं... ” हळुहळू मोटमोठे अश्रुबिंदूही त्यांच्या नेत्रांतून मोत्यांच्या ओघळत्या सराप्रमाणें गळूं लागले.

× × ×

“ आज एक पेशंट येणार आहे जेवायला, बरें का !” विश्रामनें सांगितलें. “ बरोबर त्याचें कुटुंबही येणार आहे. ”

"बरें आहे!" मोजकें उत्तर चंपूताईंनीं दिलें. वरचेवर येणाऱ्या पेशंटांचा चंपूताईंना भारी त्रास होई; पण तो सहन करणें भाग होतें.

"पाहुणे आले हं! चहा तयार होऊं द्या!" विश्रामनें सूचना दिली. चंपूताईंनीं चहा तयार केला. पाहुणे सहकुटुंब आले होते. दिवाणखान्यांत राउंड टेबलवर पेले ठेवतांना सहज चंपूताईंनीं वर पाहिलें. काय झालें कोण जाणे! चंपूताईंच्या हातून चहाचा कप खळकन् खालीं पडला!

हे पेशंट म्हणजे कमळचा पति वसंत चाफेकर किंवा चंपूताईंचा पूर्वपरिचित अण्णाच होता! चंपूताईंना अण्णानें तावडतोब ओळखलें. "आपल्याला बरें वाटत नाहीं काय?" त्यानें विचारलें.

"छे! छे! मला अगदीं बरें वाटतें आहे. मघाशीं काय झालें कुणास ठाऊक!" चंपूताईंनीं उत्तर दिलें व त्या खुर्चीवर बसल्या.

विश्रामला हें भाषण आवडलें नाहीं. पेशंट या नात्यानें येणाऱ्या मनुष्यानें एकदम डॉक्टरांच्या पत्नीबरोबर बोलूं लागणें म्हणजे काय?

वसंत चाफेकर अत्यंत सुंदर होता. तो इतका सुंदर असावा व आपल्या बायकोचें लक्ष्य एकसारखें त्याच्याकडे असावें याचा विश्रामला संताप आला. तसेंच आत्मसंयमन करून त्यानें सर्वांबरोबर गप्पा मारावयास सुरवात केली. बोलतां बोलतां शारीरिक व्यंगाबद्दल गोष्टी निघाल्या. "प्रत्येकांत बारीकसें कां होईना, पण शारीरिक व्यंग असतेंच–" वसंत म्हणाला. "उदाहरणार्थ, आमची ही!" कमळाबाईकडे बोट दाखवून वसंतराव हंसून म्हणाले, "हिच्यांत

कोठें नांव ठेवायला जागा नव्हती; पण दांत पुढें असल्याचें व्यंग आहेच ! सारांश शारीरिक व्यंग प्रत्येकांत असतेंच. ”

“ असेंच कांहीं नाहीं ! ” कमळाबाई हंसून म्हणाल्या. “ आपल्या या एवढ्याशा छोटेखानी मंडळांतही निर्दोष मानवी सौंदर्याचे दोन उत्कृष्ट नमुने आहेत. खरें ना चंपूताई ? ” या बोलण्याचें चंपूताईंना साभिमान हंसूं आलें. त्यांनीं सहज वसंतकडे पाहिलें, तों त्याच्याही चेहऱ्यावर त्याच प्रकारचें स्मित दिसत होतें व तोही कौतुकानें आपणा-कडेच पाहात आहे असें त्यांना दिसलें. वसंताचा या वेळचा हंसरा चेहरा पाहून मात्र विश्रामला त्याचा अगदीं हेवा वाटला.

“ त्या कमळाबाईंना आपण ओळखतां ? ” असें चंपूताईंनीं प्रश्नार्थक वाक्य उच्चारलें. “ अं... होय ! लहानपणापासून तिचें व माझें लग्न व्हावें अशी सर्वांची इच्छा होती; पण मींच नकार दिला... ” विश्राम अडखळत म्हणाला.

“ कां बरें ? कमळाबाई दिसायला तर किती चांगल्या दिसतात. मग कां नकार दिला ? ”

“ तिचे दांत जरा पुढें आहेत... म्हणून... ” विश्राम थांबला.

“ खरेंच नाहीं तरी ! दांत पुढें असलेले किती वाईट दिसतात, नाहीं ? ” या चंपूताईंच्या प्रश्नाचें विश्रामनें उत्तर दिलें नाहीं. तो प्रश्न त्याच्या वर्मी लागला. कारण स्वतः विश्रामचे दांत किती तरी पुढें होते ! तेथून शक्य तेवढ्या लौकर विश्रामनें काढता पाय घेतला.

वसंताची प्रकृति बरीच बिघडली होती. अनेक उपचारांचा कांहीं उपयोग होत नाहीं असें दिसून आल्यावर ऑपरेशन करण्याचें

ठरलें. ऑपरेशन लौकरच विश्रामच्या दवाखान्यांत विश्राम व सिव्हिल सर्जन यांच्या देखरेखीखालीं पार पडलें. पण... कमळचें कमनशीब म्हणा... वसंताची वाईट प्रकृति म्हणा किंवा विश्रामची चूक म्हणा-ऑपरेशन यशस्वी झालें नाहीं. लौकरच वसंतानें दवाखान्यांत देह ठेविला.

चंपूताईची अवस्था भयंकर झाली. त्यांना झालेलें अपार दुःख आंतल्या आंत दडपल्यानें कोंडमारा झाला होता. हळुहळू त्या वाळत चालल्या. विश्रामला त्याचें कारण कळलें होतें. ते आपल्याकडून औषधोपचार करीत; पण त्याचा कांहीं उपयोग नाहीं हेंही त्यांना स्पष्ट दिसत होतें. शारीरिक रोगांवर डॉक्टर औषध देईल; पण मानसिक रोगावर डॉक्टर नाहीं—महाधन्वंतरी आणले तरी काय होणार?

चंपूताई शेवटीं अगदींच खंगल्या. मोकळ्या मनानें त्यांनीं विश्रामजवळ आपली हकीगत सांगितली व एक दिवस देहत्याग केला! बिचारा विश्राम! पत्नीनिधनानें या जगांत निष्प्रेम आयुष्याचा पूर्ण अनुभव घेऊं लागला. कमळ नर्सिंगचा कोर्स संपविण्याकरितां पुण्यास राहिली होती.

कांहीं काळानंतर विश्रामच्या बोलण्यावरून कमळ त्याच्या दवाखान्यांतच नर्स म्हणून राहिली. पूर्वीपासून घरोबा असल्यानें ती त्याच्याशीं मोकळेपणानें वागे; पण त्याचा परिणाम विचित्र होऊं लागला. पुनर्विवाहाचा प्रश्न विश्रामच्या डोक्यांत वरचेवर घोळूं लागला. 'सर्व बाजूंनीं— वय, पैसा, हुषारी, धंदा, वगैरे बाबतींत आपणांस अनुरूप वधू कमळच आहे, पण तिला काय वाटेल!'

असे विश्रामचे विचार चालत.

" ती हो म्हणेल का? " विश्राम मनाला विचारीत असे. " ही माझी संपत्ति, ती मोटार, तो बंगला, माझें एकंदर ऐश्वर्य, यांचा तिचेवर कांहींच परिणाम होणार नाहीं का? मी अनेक गरिबांवर उपकार करितों हेंही तिला दिसत असलेंच पाहिजे. विचारून तरी पाहूं या. हो म्हणेलच म्हणा— मग काय! पत्रानेंच विचारावें हेंच उत्तम! " विचार करून डॉक्टरांची पूर्ण खात्री झाली कीं, आपण करतों हें अगदीं रास्त आहे. ताबडतोब ते पत्र लिहावयास बसले.

दुसरे दिवशीं कमळ डॉक्टरांचें पत्र वाचीत होती.

" एखाद्याला पुनर्विवाह करायचा असेल व योग्य तरुणी दृष्टीपथांतही आहे— पण समक्ष विचारण्यास धीर होत नाहीं, अशा वेळीं पत्रानें विचारणें हा गुन्हा होईल काय!

" कमळाबाई, आज आपणांला हें पत्र लिहीत आहें; त्याच्या उत्तरावरच माझें भावी जीवनांतील सुखदुःख अवलंबून आहे. कमळ! तुमचे सर्व सद्गुण जगाच्या नजरेस येण्यापूर्वीच वसंतरावांचा मृत्यु झाला. तुम्ही किती हुषार आहांत हें मला दिसत आहे. धंद्याच्या दृष्टीनें होणारी आपली अपूर्व मदत सदैव माझ्या दृष्टीसमोर आहेच. ज्याप्रमाणें धंद्यांत आपण जिवाभावानें मदत करतां त्याचप्रमाणें— स्पष्टच विचारतों— गृहिणी या नात्यानें जन्मभर आपण मला मदत कराल काय! या गोष्टीचा नीट विचार करा. आपल्या मातोश्री समंजस आहेत; तेव्हां तिकडून नकार मिळण्याची भीतिच नाहीं.

चमेशीं स्वभाववैचित्र्यानें म्हणा— कशानेंही म्हणा— माझा संसार सुखाचा होऊं शकला नाहीं. निदान आपल्या सान्निध्यांत तरी तें सौख्य प्राप्त व्हावें अशी आशा मीं धरली, तर त्यांत दोषार्ह असें काय आहे? तथापि आपली इच्छाच नसेल —मग असलें कोते विचारच आपल्या मनांत येणार नाहींत— तर तसेंही कळविण्यास अनमान होऊं नये.

" या पत्राच्या उत्तरावरच माझ्या भावी जीवनक्रमाचा निकाल लागणार आहे. तेव्हां नीट विचार करून लौकरच उत्तर धाडावें अशी विनंती आहे.

" प्रश्नोत्तराची चातकाप्रमाणें मार्गप्रतीक्षा करणारा,

आपला,

—विश्राम."

कमळला फार...फारच विचार करावा लागला. शेवटीं मनाचा दृढ निश्चय करून तिनें उत्तर लिहिलें. या वेळीं तिची मुद्रा म्लान झाली होती, व तिच्या मृगसदृश नेत्रयुग्मांत मोठाले टपोरे अश्रू-बिंदु उभे राहिले होते.

× × ×

दुसरे दिवशीं कमळचें पत्र डॉक्टरांना मिळालें. परीक्षेचा निकाल कळायच्या दिवशीं ज्या उत्सकतेनें विद्यार्थी तार फोडतो त्याहून जास्त उत्सुकतेनें डॉक्टर पत्र फोडून वाचूं लागले.

" डॉक्टरसाहेब !

आपण मला एक बिकट प्रश्न घातला आहे. आपणांसारखे श्रीमंत, हुषार, व तरुण असे पति मिळत असतां माझ्यासारख्या सुधारणाप्रिय मुलीनें त्याला नकार देणें संभवनीय नाहीं असें गृहीत धरून आपण पत्र लिहिलें. आणि मीं देखील नकार दिला नसता; पण,—डॉक्टर, हा ' पण ' शब्द मध्यें आल्याबद्दल भारी दिलगिरी वाटते. पण माझा अगदीं नाइलाज आहे. एक काळ असा होता कीं, ज्या वेळीं आपण नुसता एक होकारार्थी शब्द उच्चारला असता तर आपण पतिपत्नींच्या नात्यानें बद्ध झालों असतों. पण आपण नकार दिलांत ! हुंडा वगैरे आपण जास्ती मागितला असता तरी तो सहज आईला देतां आला असता. पण आपण कोणतें कारण दाखविलें होतें बरें ! तेव्हां आपल्याला सौंदर्याची खरी परीक्षा आणि अपेक्षा होती. आतां आपला संसार अर्धामुर्धा झाला आहे. पत्नी सुस्वरूप नसली तरी सुविद्य, समान स्वभावाची, धंद्याच्या दृष्टीनेंहि उपयोगी पाहिजे—नव्हे चालेल—हें आपलें हल्लीं बनलेलें मत आहे व त्यास अनुसरून आपण माझ्या संमतीची अपेक्षा केली आहे. पण आपण मला एकदां नकार दिला होता हें आपल्या लक्षांत नसलें तरी मी कधींहि विसरूं शकणार नाहीं. डॉक्टर ! बाण जेथें लागतो तेथें त्याची जखम होते, जेथून निघतो तेथें नाहीं !

" नाकारायचें कारण जें व्यंग तें अजूनहि माझ्यांत आहेच ह्या गोष्टीचा मला विसर पडला नाहीं. डॉक्टर, क्षमा करा ! तुम्हांला मी लावून बोलत नाहीं. पण मन म्हणून अशी कांहीं वस्तु आहे

कीं, तिला झालेल्या जखमा कधींहि बुजत नाहींत ! विश्राम, खरें सांगूं का ! खरोखरच तेव्हां तुमच्या जन्माच्या सहवासाची मी अपेक्षा करीत होतें; पण माझी भयंकर निराशा झाली !

" आज आपल्याला माझ्या सहवासाची अपेक्षा वाटते. पण माझ्या मनःस्थितीबद्दल मी काय लिहूं ? रागावूं नका, डॉक्टर ! मी तुम्हांला मनःपूर्वक सांगतें कीं, माझ्या मनांत पुनर्विवाह करावयाचा नाहीं. आपणांस माझ्याहून सरस अशी अनुरूप वधू मिळण्यास कांहींच अडचण पडणार नाहीं आणि मी देखील तशी वधू पाहून द्यायच्या बाबतींत तुम्हांस मदत करूं शकेन.

" आपली इच्छा नसेल तर मी एथलें काम सोडून दुसरीकडे कुठेंहि खटपट करीन. पण आपली हरकत नसल्यास पूर्वींप्रमाणेंच यापुढेंहि प्रेमळ भगिनीच्या प्रेमळ नात्यानें आपणांस मदत करीन.

" संतापाच्या भरांत अधिक उणें लिहून गेलें असेन तर माफी करावी. माझे विचार कोते आहेत हें मला कबूल आहे. पण प्रयत्नानेंहि ते पालटतां येत नाहींत त्याला माझा इलाज काय ?

आपली भगिनी,
कमळ चाफेकर."

पत्र वाचून डॉक्टर आश्चर्यानें स्तम्भित झाले. कमळ नकार देईल अशी त्यांना ओझरती देखील कल्पना नव्हती.

" मीं इतक्या मुलींना नकार दिला, हवीं तशीं नांवें ठेविलीं त्याचें Tit for Tat [जशास तसें] या न्यायानें मला हें प्रायश्चित्तच मिळत आहे काय ? " उद्वेगानें डॉक्टरांच्या तोंडून शब्द निघाले.



# सुलभेचीं पत्रें

## ( १ )

प्रिय नलिनी,

तुला आज एक गम्मत कळवणार आहे. काल किनई, मला ' पहायला ' आले होते. एक सुंदर ऐटबाज तरुण... एक पन्नाशीच्या वयाचे पोक्त गृहस्थ व साधारण चाळिशीच्या वयाच्या एक पोक्त बाई. तो तरुण भारीच चौकस होता. किती तऱ्हांचे प्रश्न त्यानें मला विचारले. अन् सांगूं ? मला तर लाजतांना पुरेवाट झाली बाई अगदीं ! अन् मी अडखळलें सुद्धां शंभरदां बावळटाप्रमाणें ! पण तरीसुद्धां मी ' पसंत ' असल्याचा आजच निरोप आला आहे.

नलू, तुला केव्हां ही सुवार्ता कळवीन असं मला तेव्हांपासून झालेलं आहे ! आणखी कुणाला सांगूं म्हटलं तर ही मेली लाज आहे ना ? एकदां जरा वाईट वाटलं, शिक्षण अपुरं राहिलं म्हणून. पण आईबाबांचे ते आनंदी चेहेरे पाहून कितीतरी समाधान वाटलं म्हणून सांगूं ? आईचे डोळे दिवसभर ओले दिसताहेत, पण ते शंभर हिश्शांनीं आनंदाश्रू असावेत. दोन वर्षें गळ्याला लागलेली पोरगी एकदांची सुस्थळीं पडलेली पाहून कोणती आई आनंदानें आसवें गाळणार नाहीं ?

आणखी नले, ते हुंडा तर बिलकुल घेणार नाहींत म्हणे ! किती

थोर मनाचीं माणसं असावीत तीं... ! तो तरुण तसाच दिसत होता सद्गुणी... पण पुरेच बाई ! आनंदाच्या भरांत कुठेंतरीच मी वहात चाललें आहें. तुला तर सदान्‌कदा थट्टा करायला आयतं फावेल यामुळें... पण तूंच सांग, हा आनंद अनाठायीं आहे का माझा ! बाबांसारख्या पस्तीस रुपड्यांच्या खर्डेघाश्या कारकुनाच्या मुलीला विनहुंड्याचं स्थळ, अन् असा पाणीदार तरुण नवरा म्हणजे अलभ्य लाभच वाटायचा. त्यांतून आम्ही सहाजणी आहोंत एका-खालीं एक ! तूं येशील ना नलिनी ? तुझ्या लालपुरापासून माझें नीलगांव अगदीं जवळ आहे. मी स्वतां बोलावून सुद्धां येणार नाहींस तर तूं मैत्रीण तरी कसली ? तुझ्या भालूदादाला नमस्कार सांग. पण त्याला पत्र दाखवूं नको हं... !

तुझी

—सुलभा.''

( २ )

प्रिय नलूताई,

लग्न होऊन आज दोन महिने झाले ! यावेळीं मी सौख्यशिख-रावर असेन अशी तुझी कल्पना असेल. पण कसं अन् काय लिहूं तुला ! तुला लग्नाला येतां आलं नाहीं, नाहींतर कोणत्या दुर्दैवाच्या गळयांत मीं माळ घातली हें तुला त्याच दिवशीं कळून चुकलं असतं !

नलू, अंतरपाट काढला न् माळ घालायला आनंदानं मान वर केली अन्— वज्राघातच झाला ! त्या सुंदर तरुणाऐवजीं तो पोक्त

*मनुष्य निलाजरेपणानं नवरा म्हणून उभा राहिलेला मीं पाहिला. मला घेरी आल्यासारखं झालं अन् असहायपणानें माझ्या हातून माळ गळून पडली !*

तुला समजलं ना ? पहायला आलेली ती स्थूल बाई माझी थोरली जाऊबाई... ! तो पन्नाशीचा प्राणी पतिराज, अन् तो उमदा तरुण— ज्याला मी आशाळभूतपणानें पति समजलें— तो माझा पुतण्या, बरं नले ! काय चमत्कारिक खेळ तरी दैवाचे !

नलिनी— कशी ग मी अशी फसलें ? बाबांच्या इतका मोठा नवरा ! शेतीवाडी, घरदार, दागदागिने सारं आहे... पण सुख ? त्याची अंधुक छायासुद्धां मला दृष्टीस पडण्यासारखी नाहीं. उलट ह्या थेरड्याशीं सारा जन्म कंठला पाहिजे मला... !

प्रत्यक्ष पतिदैवताला म्हातारडा म्हटल्याबद्दल तूं मला दोष देशील... आर्यपत्नीत्वाच्या निर्मळ कीर्तीला हा मीं भयंकर कलंक लावला असं सुद्धां तुला वाटेल... वाटूं दे ! खुशाल तूं मला नांवं ठेव... पण... पण मुक्या संतापानें माझ्या जिवाचा इतका कोंडमारा झाला आहे कीं, जर कुठेंच त्याला मोकळी वाट केली नाहीं...तर, नले, वेड लागेल मला. उद्वेगाच्या भरांत मनांतले वेडेविद्रे विचार तुला... जिवलग मैत्रिणीला... कळवले तर एकदमच तूं मला वाईट ठरवूं नकोस. माझ्या दृष्टीनें ह्या प्रकाराचा विचार केलास तर तुला माझी कींवच करावीशी वाटेल.

ह्या दोन महिन्यांत पांचसातदां त्यांनीं माझ्याशीं बोलण्याचा प्रयत्न केला. मला तर नुसतं बोलणं ऐकलं तरी तिटकारा वाटतो.

अन् अंगावर शहारे येतात. ह्यांनीं एका आनंदी मुलीच्या जन्माची कां नासाडी करावी ! आतां आवरतें घेतें. कोळसा उगाळावा तितका काळाच !

तुझी,
—सुलभा."

ता. क.— भालूदादा पत्र मागेल, पण द्यायचं नाहीं. उगीच त्याला वाईट वाटायचं ! —सुलभा."

( ३ )

प्रिय नलूताई,

तुझें पत्र मिळालें. तुझ्या प्रेमळ शब्दांनीं किती बरें वाटलें म्हणून सांगूं ! माझ्याबद्दल कळकळ बाळगणारें व आपुलकी व्यक्त करणारें निदान एक तरी हृदय आहे ही मोठी महद्भाग्याचीच गोष्ट समजतें मी !

तूं लिहितेस—प्रारब्धानं ज्या माणसाशीं जन्माची गांठ पडली त्याच्याशीं नीट वागणं हें पतिव्रतेचें लक्षण आहे ! पतिव्रता...! असल्या मिळमिळीत शब्दांच्या आधारानं माझ्या हृदयाचे कढ थंड पडतील असं वाटतं तुला ! असल्या असह्नीय थेरडोपंतांच्या मनधरणीनं वागण्यापेक्षां मी पतिव्रता नाहीं असं ऐकून घेणंच मला सुसह्य वाटेल ! नले ! पतिदैवत...! नकोच ! दैवत शब्दाची

ही शुद्ध विटंबना आहे...म्हातारेबुवांचे सद्गुण ऐकलेस तूं? ते साध्या शास्त्रवचनांतून, अन् नेमनिष्ठेंतून बंधमुक्त आहेत वाटतं—? परवां मी माझ्या एका ओळखीच्या घरीं गेलें न् समोरच्या हिरव्या माडीवरून उतरतांना मीं ह्यांना बघितलं! माडी कुणाची? चम्पाजीचीऽ! आतां मात्र तीव्र द्वेषाखेरीज कोणतीहि भावना मनांत प्रवेशूंच शकत नाहीं माझ्या!

नलुताई! आम्हांला सजीव तरी कां म्हणायचं? हिंदु कुमारिका...म्हणजे नुसतीं यंत्रें...ठरींव मर्यादेंतच आमच्या हालचाली व्हायच्या. अन् यंत्रावरचा अधिकारी...म्हणजे नवरा! मग तो अगा पशुतुल्य का असेना! त्याच्याच इच्छेप्रमाणें ह्या यंत्रांनीं कामं करावीं ...! मला अगदीं चीड येते. पण चिडण्यापलीकडे माझ्या हातांत आहे काय?

आम्ही सहा बहिणी...म्हणून विनपैशाचं हें 'अप्रतिम स्थळ' हुडकून वडील काळजींतून मुक्त झाले! पण विनपैशानं त्यांनीं मुलीला विकली अन् ती शुद्ध एका.........जाऊं दे...भलत लिहिलं जाईल...म्हणून इथंच पुरतं करतें.

तुझी दुर्दैवी,
—सुलभा."

( ४ )

प्रिय नलिनी,

आज कोणत्या भयंकर मनःस्थितींत मी हें पत्र लिहीत आहें, याची तुला कल्पनासुद्धां नसेल. काल ह्यांच्या अन् ह्यांच्या सर्व

राक्षसी आतांच्या नीचपणाचा कळस झाला आहे. कालची हकीकत झाली तशी तुला लिहितें. मग चूक कुणाची हें तूंच ठरीव.

काल दिनूकडे ( माझा पुतण्या ) मन्या माणके आला होता. तो किती वर्षें आमच्या शेजारीं असलेला माहीत असेलच तुला. माहे-रच्या लहानथोरांचें कुशलवृत्त विचारण्याची केवढी मला उत्सुकता ! मीं चहा वगैरे नेऊन दिला व मुद्दाम " ओळखलंत कां मला ? " असें विचारलें.

तो गोंधळून गेला. नाहींतरी पूर्वीच्या ओळखीवर कुणीही मला ओळखूं शकणार नाहीं इतका मोठा अंतर्बाह्य फरक माझ्यांत पडले-ल्याची मलाही जाणीव होतीच. अन् त्यांत आश्चर्य आहे का ? धग-धगीत विस्तवावर एकसारखा ठेवलेला जिन्नस करपायचाच !

शेवटीं मींच म्हटलं, " मी मालशांची सुली. दिनकरपंत पुतणे लागतात माझे." तो चकित झाला. पण मीं माझ्या मैत्रिणींबद्दल चौकशी केली. त्याचीं त्यानं मोकळ्या मनानं उत्तरं दिलीं.

नली, चोरून कशाला ठेवूं ? तुझ्या दादाबद्दल मीं मनांत कांहीं विशेष भावनांची जोपासना लग्नापूर्वी केली होती हें आतां प्रांजल-पणानं कबूल करतें. पण लग्न होतांच त्या भावनांना मीं निग्रहानें बंधुत्वाचें रूप दिलें होतें. पण बाळपणीची आपुलकी विसरेन कशी ग मी ! मन्याच्या क्लासांतच तुझा दादा आहे एवढंच मला ठाऊक होतं. सासुरवासणीनं परपुरुषाची वृथा चौकशी करणं मोठं पाप होतं हें मीं विसरलें अन् त्याला विचारलें— " मधुकर साठे वर्गातच आहे ना तुमच्या ? मैत्री आहे का तुमचीत्याची ? "

" फारशी नाहीं मैत्री. तो फार अभ्यासीच झालाय् हल्लीं. "

" त्याचं लग्न झालं कां ! "

त्याला तो प्रश्न ऐकून चमत्कारिक वाटलें. डोळे उडवीत तिरसट-पणानं तो म्हणाला, " कुणाला ठाऊक ! मला त्याच्या लाईफची कांहीं सूक्ष्म माहिती नाहीं अन् मिळवावी अशी जरुरी पण भासली नाहीं तुमच्यासारखी— "

नैराश्यानें मी मागें वळलें तों... पतिराज, जाऊबाई, भाऊजी, ... ती खडी सेना पाहूनच माझें तोंड उतरलें व छातींत धडकी भरली. वीज चमकणें हें वर्षावाचें निश्चित पूर्वचिन्ह समजतात. तद्वत् या जळजळीत त्रैमूर्तींचें दर्शन पुढील गडगडाटाचें निदर्शक असेंच मला वाटलें... ! अन् तसंच झालं. तो मन्या बाहेर पडतांच वर्षाव धों धों सुरू झाला.

" मधुकर साठे कोण तुझा ऽऽऽ... "

" त्याच्या लग्नाची हिला कशाला चौकशी हवीय् ! आश्चर्य आहे मोठं... "

" नाहीं झालं त्याचं लग्न... तुझ्यासाठीं तर तो खोळंबून वाट पहात बसलायऽ ! "

" जायचं असेल तर खुश्शाल उठून जा ! इथं खेट्टर नाहीं अडलं कुणाचं ! "

" पण मी आहें ना... जिवंत ! ह्या वेस्वेला आधीं... "

जाऊं दे ! गटारांतनं घाणच पाणी वहात असतं सदासर्वकाळीं ! हें व आणखी कुलीनांच्या माना शरमेनं आपोआप खालीं जाव्या

इतकं अभद्र, अन् अचकटविचकट, ते दुष्ट बोलत होते, तें कुठवर लिहूं तुला !

तात्पर्य इतकंच कीं तुझ्या भावाची मीं चौकशी केली हा अगदीं अक्षम्य अपराध झाला अन् चूक झाली. तर ती आतां निस्तरली पाहिजेच ना ?

मला कांहीं सुचेनासं झालं आहे. दाराला आंतून कडी घालून हें तुला खरडीत आहें. बाहेर जाऊबाईच्या घाणेरड्या व्याख्यानाला अगदीं ऊत आलेला मला इथून ऐकूं येत आहे...पण कान असून बहिरी आहें आज मी !

पुढचें पत्र कुठल्या परिस्थितींत लिहीन...देव जाणे ! कृपा कर अन् हें पत्र तुझ्या दादाला मुळींसुद्धां दाखवूं नको. माझ्या गळ्याची शपथ आहे तुला.

तुझी,

अभागिनी—सुलभा."

( ५ )

" सेवाश्रम, हरितपूर.

नले ऽऽऽ!

पत्रावरचा पत्ता पाहून तूं अगदींच चकित होशील. काय घडलें असावें याची कल्पना करतांना तूं बेजार होशील ! पण एवढेंच लिहितें कीं पूर्वीच्या त्या धगधगीत खाईतून निघून मी बऱ्याच सुस्थळीं आलें आहे. माझ्यासारख्याच एका दुर्दैवी बाईच्या कर्तबगारीचें दृश्य फल म्हणजे हा आमचा सेवाश्रम आहे. अल्पवेतनावर मी इथें

शिक्षकीण आहे; आणि मोठ्या बाई इतक्या प्रेमानं वागतात कीं त्यांचा आसरा असल्यावर मी माझ्या आवडत्या आईच्या छत्राखालीं आहेंसें मला वाटतें. ह्या सेवाश्रमांत नर्सिंग कोर्स घेतां येतो व इच्छा असल्यासें मॅट्रिकपर्यंत शिक्षण होऊं शकतं. मी नर्सिंग कोर्स घेतला आहे. ह्यासारखा परोपकारी अन् पुण्यदायी कोर्स दुसरा कोणता असणार ? निदान या जन्मीं अशा पुण्याचा संचय केला तर पुढील जन्मीं (असेलच तर) तरी मनाजोगा पति भिळेल हीही एक मोडकीतोडकी आशा आहेच ना ? पण तें जाऊं दे. मागली हकीकत पुरती केली पाहिजे आधीं !

त्या दिवसानंतर मला घरांत असह्य जाच होऊं लागला. नुसतं मान वर करून नोकराकडे किंवा कुणाकडेही नजर टाकायचीसुद्धां सोय राहिली नाहीं. कारण मला पापी दृष्टीशिवाय पहातां येणें अशक्य, अशी घरांत द्वाही फिरली होती ना ? घर फिरले कीं वासे फिरायचेच त्याचे ! सखू मोलकरीणसुद्धां मोठी कल्पक डोक्याची होती आमची, हें त्याच वेळीं मला कळलें. माझा अन् एका नामांकित बाहेरख्याली तरुणाचा गांवांत रोज पत्रव्यवहार चालू होता एवढेंच नव्हे, तर त्यांत दूती—खुद्द सखूच होती म्हणे ! केवढी मनोरंजक पण घातुक कादंबरी रचली होती मेलीनं ! त्या संशयानं माझ्या अपरोक्ष किल्ल्या चालवून त्या नीच पशूंनीं माझी ट्रंक तपासली व त्यांत तुझीं पत्रें त्यांना सांपडलीं. त्यानंतर तर घरांत अगदीं क्रांति झाली. ते लोक इतके माझ्यावर आरोप लादूं लागले कीं तेथें राहण्याचीसुद्धां मला किळस आली; अन् पहांटे मी घरांतून बाहेर पडून ह्यालावनवासानं इथं

येऊन पोंचलें. आता माल माझ्यामागची कटकट पूर्ण मिटली आहे.

त्यांचं म्हणे तिसरं लग्न होणार आहे. होईल! होईल...! असल्या नराधमांनासुद्धां पैशापायीं आपल्या कोंवळ्या पोरी दान करणारे, गरीब नडलेले बाप अजून आपल्या पांढरपेशा वर्गांत खूप आहेत. तेव्हां तिसरंच कां? पांचवंसुद्धां लग्न होईल त्या म्हातारड्याचं! मी मात्र जिवंत सुटलें बाई!

पुरे आतां! त्या मागल्या कुळकथा उकरून काढल्या कीं मला फारच मानसिक त्रास होतो. हें माझं विद्यार्थिनीचं नवं चरित्र सुरूं झालं आहे. यांत त्या मागल्या दुःखद आठवणींचा वासवारादेखील नको ऽऽ! तूंही तें लिहीत जाऊं नकोस कांहीं! सुलभा गेली! मी आतां 'कु. दुर्लभा जाधव' असें इतर जातीचें टोपण नांव घेतलेलें आहे कुणाला ओळखूं नये म्हणून! तुजजवळचीं माझीं जुनीं पत्रें फाडून टाक एकदम उद्यां!

तुझी—

दुर्लभा जाधव."



# त्यक्ता

"पत्र पाठवायचं हं—" गाडी सुटतां सुटतां जड आवाजांत निर्मला उद्गारली. नलिनीकांत गाडींतून जोंपर्यंत दिसत होते तोंपर्यंत डोळ्याची पापणीसुद्धां न हलवतां तिची दृष्टी तिकडे लागून राहिली होती. हळुहळू स्टेशनचें कांपाउंडदेखील दिसेनासें झालें. तेव्हां एक दीर्घ निःश्वास टाकून निर्मलेनें खिडकींतून आंत डोकें घेतलें व खिन्न हृदयानें ती बांकावर बसली. हळुहळू तिनें आपलें सामान लावून फराळाची करंडी, ट्रंक वगैरे सामान लावून टेवलें. ट्रंक उघडून कसलीशी कादंबरी काढली व ती वाचण्यास सुरुवात केली. पण वाचनांतही तिचें चित्त नव्हतें. तिनें ती तशीच मिटली व तिच्या डोळ्यांत पाणी सांचून तें खळ्‌कन्‌ गालांवरून ओघळलें.

आपणांकडे कुणी पहात तर नाहीं हा विचार आतां तिच्या मनांत शिरला व तिनें आपले पिंगट रंगाचे पाणीदार डोळे आजूबाजूस फिरवले. तो बायकांचा डबा होता. चारएक बायका डब्यांत असतील—नसतील. पैकीं दोन मारवाडणी बुरखे पांघरून आपापसांतच गुडगुड करीत होत्या. एक म्हातारी घाबळी पांघरून कोंपऱ्यांत पेंगत बसली होती. चौथी एक बाई मात्र तिची मुलगी खिडकी-जवळ बसण्यासाठीं धांवपळ करीत होती तिला आवरण्यांत गुंतली होती. निर्मलेकडे ती मधूनमधून सारखी पाहत होती. स्टेशनवर नलिनीकांतांनीं घेतलेला तिचा निरोप व तदनंतर विरहकल्पनेनें

होणारी तिची खिन्न स्थिति हें सर्व पाहून गतायुष्यांतल्या कसल्याशा स्मृतीनें त्या बाईच्या डोळ्यांतही अश्रू उभे राहिले होते.

तिच्याकडे पाहिल्याबरोबर तिची विचारपूस करून ओळख करून घ्यावी असें निर्मलेला वाटलें. पण आपण होऊन कसें बोलावें अशी तिच्या सुशिक्षित मनांत शंका उद्भवली.

" ए आई अ ऽ ... मी बसूं का त्या खिडकीशीं! अं ऽ! सांग ना! बसूं का ... ?" लाडिकपणानें आईच्या अंगाला अंग घाशीत ती मुलगी म्हणाली. हें बोलतांना निर्मलेच्या बांकावर खिडकीशीं मोकळी जागा होती, तिकडे ती बोटें दाखवीत होती.

" कांहीं नाहीं बसायचं तिकडे— ही बघ— इथनंच किती जम्मत दिसते आहे ती— " मुलीला दटावीत ती उद्गारली व निर्मलेकडे तिनें नीट न्याहाळून पाहिलें.

निर्मला अलीकडील फॅशनची अगदीं चहाती दिसत होती. पायांत फिक्कट निळ्या मखमलीच्या चंपल्स, अहमदाबादी जरीकिनारीचें तपकिरी फॅन्सी पातळ, आंखूड बाह्यांचा व मोठ्या कापलेल्या गळ्याचा तस्साच ब्लाऊज, हातांत छोटें रिस्टवॉच, सुताइतके बारीक नाजूक बिलवर, सोनेरी फ्रेमचा चष्मा— अमुक नाहीं म्हणायला जागाच नव्हती! निर्मलेच्या सौंदर्यपूर्ण कांतिमान् देहयष्टीला हें सर्व खुलत होतें. इतक्या श्रीमंत फॅशनेबल बाईशेजारीं बसण्याचा मुलीनें हट्ट केला तरी तो पुरा कसा व्हावा!

" बसूं द्या कीं इथं—मलाही पुष्कळ जागा आहे... ये बाळ!" निर्मलेची वात्सल्यपूर्ण हांक ऐकून तावडतोब मुलगी त्या बांकावर

आरूढ झाली. तिला आंवरायला म्हणून तिची आईही जवळ येऊन बसली. दोन बायका इतक्या जवळजवळ बसून कांहींही भाषण न करणं शक्यच नव्हतें.

" कोठें जायचं आहे ? " निर्मलेनेंच प्रथम प्रश्न टाकला.

" दादरला— "

" होय का ? " आनंदून निर्मला म्हणाली— " बरं झालं बाई ऽ ! मी उतरणार आहें बोरीबंदरला— म्हणजे चांगली थेटची सोबत भेटली म्हणायची. तिथें या मुलीचे वडील आहेत वाटतं ? का तुम्ही माहेरीं म्हणून जात आहां ? "

निर्मलेचा बोलका स्वभाव तिला आवडला. तीही मनमोकळीं उत्तरें देऊं लागली.

" सासरची गोष्टच बोलूं नका— माहेर आहे— पण काय उपयोग— ? "

" म्हणजे ? " चकित मुद्रेनें तर्जनी वांकवून हनुवटीला स्पर्श करीत निर्मलेनें विचारलें.

" म्हणजे माझं दुर्दैव ! सोन्यासारखी मुलगी घेऊन आपल्या हक्काच्या घरांतून आपखुषीनं मी बाहेर पडलें— मग असंच कुठं तरी भटकून पोटाची खळगी भरायला नको का ? ज्यांच्या जिवा-साठीं स्त्रियांचं जिणं असतं त्यांनींच तें कवडीमोल मानलं तर माझ्या-सारख्यांना आपलेपणानं कोण आश्रय देणार ? सांगा— "

मनाची तळमळ तिच्या शब्दाशब्दांतून ध्वनित होत होती व तिची जाणीव निर्मलेलाही होत होती. अशा वेळीं तिला माहेरीं

देखील आश्रय मिळूं शकला असता ही शंका मनांत येऊन निर्मलेनें विचारलें, "तुमच्या आईजवळ नाहींतर भावाजवळ राहण्यानं हे हाल चुकले असते. हींही मायेचीं माणसं आपल्याला नाहींत का?"

"आहेत—" रुद्धकंठानें ती म्हणाली. "देवदयेनं माझ्या भावाची डॉक्टरी उत्कृष्ट चालली आहे. माझ्या वडिलांना भरपूर पेन्शन आहे व माझी प्रेमळ जन्मदात्री माउलीही अजून आहे. पण तुम्हीच सांगा, सासरीं निराश्रित होऊन अपमानाचं जिणं जगवायला माहेरीं जाणें, आणखी सासरीं सारं व्यवस्थेशीर असतांना चार दिवस हक्कानं माहेरपणाला जाणं,— यांत जमीनअस्मानाचा फरक आहे कीं नाहीं? माहेरचं असलं मेलेलं अन्न खाणं मला तर बिलकुल योग्य वाटत नाहीं. मी तर माझ्या दुर्दैवाची कहाणी त्यांना अवाक्षरानं देखील कळवली नाहीं व कळवणारही नाहीं. आपोआप कळेल तेव्हां कळेल!"

बाईच्या पाणीदारपणाचें व स्वाभिमानाचें निर्मलेला कितीतरी कौतुक वाटलें. आपण ग्रॅज्युएट असलों तरी असल्या गुणांची आपल्याजवळ दुर्मिळता आहे असें तिची मनोदेवता तिला सांगत होती. मोठ्या आदरानें निर्मला तिच्याकडे निरखून पाहूं लागली.

परिस्थितीमुळें व कष्टप्रद जीवनामुळें तिच्या चेहऱ्यावर राकटपणाचा भास होत होता; तथापि सुस्थितींत असतांना ती रेंखीव व सुंदर दिसत असावी असें सहज अनुमान होत होतें. चेहऱ्यांतील आकर्षकता व बांध्याची सुबकता यांमुळें तिच्या सौंदर्याला जास्तच उठावदारपणा येत असावा ही कल्पना ओघानेंच निर्मलेच्या मनांत

आली. तिला घर सोडण्यास तसेंच कांहीं विशेप कारण झालें असावें असें वाटून निर्मलेनें प्रश्न केला, "पण घर सोडण्याजोगं एवढं विशेष काय घडलं ताई—?" अगदीं अगदीं सहजस्फूर्तीनें 'ताई' हें नांव निर्मलेनें उच्चारलें.

"काय घडलं विचारतां, होय!" 'ताई'ला हंसूं आलें. परंतु तें गमतीचें मजेदार हास्य नव्हतें. उलट 'अति झालं नि हंसूं आलं' अशा आशयाच्याच भावना तिच्या चर्येवर उमटल्या.

"तुम्हांला त्यांत माझीही चूक वाटेल— कांहीं का असेना— सत्य तें मी तुम्हांला सांगतें न् मग घर सोडण्यांत मी चुकलें कीं काय हें तुम्हीच सांगा—" हीं प्रस्तावनात्मक वाक्यें उच्चारून ती खिडकींतून बाहेर पाहूं लागली. आपली हकीगत सांगावी कीं नाहीं याबद्दल ती जणूं विचारच करीत होती.

"नव्या ओळखीवर हकीकत मीं विचारली म्हणून मन साशंक झालं आहे ना?—" निर्मलेनें तिची चलबिचल ओळखून मुद्दाम विचारलें.— "पण मला आपली धाकटी बहीणच समजा तुम्ही. तुमच्याबद्दल खरोखरच मला आदर वाटतो व म्हणूनच मीं एवढ्या बारकाईनें तुमची चौकशी केली. मग सांगतां ना!"

"सांगतें अं!" मृदु स्वरांत तिनें सुरवात केली. "लग्न झाल्यावर आठपंधरा दिवसांतच ते सुट्टी संपली म्हणून कॉलेजमध्यें गेले. तेवढ्या थोड्या अवकाशांतच मला त्यांच्या क्षुब्ध नजरेवरून कळलें कीं हें लग्न त्यांच्या मर्जीविरुद्ध झालें आहे. माझी त्यांत काय चूक होती सांगा!—

" पहिल्या वर्षी ते मे, दिवाळी व नाताळ या तिन्ही सुट्यांत घरीं आले. पण मला पाहून त्यांची चर्या अगदीं खिन्न होई ! साहजिकच मला त्याचें फार वाईट वाटे. पुढें पुढें मी त्यांच्या दृ्ी-समोर येण्याचेंच शक्य तेवढें टाळूं लागलें. आपला जन्म त्यांच्या सुखासाठीं खरा; पण आपणच त्यांच्या दुःखाचें मूळ असावें— ही गोष्ट रात्रंदिवस मला बोंचत असे. पण निष्कारण समोर येऊन त्यांच्या मानसिक उद्विग्नतेंत भर कां घालावयाची ?—

" ही आमची माणिक— " मुलीच्या पाटीवरून वात्सल्यानें हात फिरवीत तिनें आपली हकीगत पुढें चालू केली. " हिला तीन महिन्यांची घेऊन मी सासरीं आलें. त्याच सुमाराला दिवाळी म्हणून ते घरीं आले होते. मी मुलीच्या आनंदांत सारं विसरून गेलें होतें अन् मला वेडीला वाटलं कीं तेही विसरले असतील ! त्या दिवशीं बाकीची पुरुषमंडळी, भाऊजी न् मामंजी, दुकानांत लक्ष्मीपूजनांत गुंतले होते. मी एकटीच मुलीला मांडीवर घेऊन खेळवीत होतें. इतक्यांत ते आले. माणिक मारे हंसायला लागली. मीं कौतुकानें म्हटलें, 'कशी हंसत्येय् पाहिलं ना ! '— परंतु त्यांची मुद्रा अत्यंत खिन्नच होती. ' हं खरंच ' कांहींतरी उत्तर द्यायलाच हवं म्हणून ते निर्विकार मुद्रेनं उद्‌गारले. मला कससंच वाटलं. अपत्यप्रेम, वात्सल्य, कौतुक, आनंद, जिव्हाळा... कांहीं कांहींच त्यांना मुलीबद्दल वाटूं नये आपल्या ! इतका जर संसाराचा वीट आला होता तर लग्न तरी कां करावं ! संतापानें मी विचारणार होतें; पण माझी क्रुद्ध मुद्रा पाहून ' कोणसं आलंय् वाटतें— ' असं पुटपुटत त्यांनीं तेथून काढता

पाय घेतला.

" ह्या व अशा अनेक प्रसंगांवरून मला पक्कं कळून चुकलं कीं केवळ सुशिक्षित समंजसपणामुळेंच ते आडमुठेपणानं वागूं शकत नाहींत व मनाची स्थिति दर्शवूं शकत नाहींत; पण खरीखुरी त्यांना बायकोची मनांतून अडगळच झाली आहे.—" ह्या आठवणीनें तिच्या डोळयांतून पाणी झिरपूं लागलें.

" हें पहा —अस्सं होतं बघा—" डोळे पुसून पुन्हां हंसऱ्या मुद्रेनें ती निर्मलेला म्हणाली— " ती आठवण झाली कीं मनांत नसतांना डोळयांतून पाणी येतं बघा.—

" तें त्यांचं कॉलेजचं शेवटचं वर्ष होतं. पुण्याला दोघांनाच बिऱ्हाड करावं लागलं. कारण मामंजी वार्धक्यानं मृत्युवश झाले होते. अन् भाऊजी काशीच्या गुरुकुलांत शिकायला गेले होते.

" आमचा नवा संसार सुरू झाला खरा; पण त्यांत निरुत्साह व नैराश्य यांचाच समावेश होत असे. मनाजोगी बायकोच नाहीं— मग संसार कसला तो ! अवश्य तें संभाषण होई माणिकला खेळणीं—कपडेलत्ते यांची लयलूट होती. मलाही कांहींच कमतरता नव्हती. पण मला चैन मात्र वाटत नव्हतें. त्यांची वृत्ति मजबद्दल प्रेमपूर्ण दिसत नसे हेंच माझ्या बेचैन वृत्तीचें मूळ होतें. माझ्याशीं बोलायला तरी त्यांना फारशी फुरसत होती कुठं ? ते फार बुद्धिमान् होते. सदान्कदा ते वाचन व लेखन यांत मग्न असत. पुढें ते एक मासिक काढणार होते—त्याबद्दल अनेक टांचणें व कल्पना टेबलावर मला नेहमीं आढळून येत असत. "

विसाव्यासाठीं ती अंमळ थांबली. पतीबद्दलचा अभिमान आतां स्पष्टपणें तिच्या आवाजांत सामावला होता. अजूनही पतीबद्दल तिच्या आदरयुक्त भावना पाहून निर्मलेचा तिजबद्दलचा आदर दुणावला. इतक्या प्रेमळ पत्नीचें हृद्गत कळूं नये हें पतीच्या बुद्धिमत्तेचें लक्षण होतें काय? हाहि विचार निर्मलेच्या मनांत आला. पण इतक्यांत 'ताई'नें हकीकत पुढें चालू केली होती.

" ते रोज कांहींतरी लिहीत. त्यांच्या या खिन्नतेचें व अबोल मुग्धतेचें कारण लिहूनच विचारावें अशा कल्पनेनें कागदासाठीं मीं अगदीं सहज ड्रॉवर उघडला. मी टेबलाला फारसा हात लावीत नसल्यानें ड्रॉवर उघडा असावा. त्यांत त्यांचें तें गुप्त लिखाण दिसलें. त्यांत मला काय समजून आलेंसें वाटतें तुम्हांला ! "

" काय समजलें ? " उत्सुकतेनें अधीर स्वरांत निर्मलेनें विचारलें.

" त्यांच्या खिन्नतेचं कारण ! कॉलेजांतल्या एका मुलीबरोबर शिक्षण संपवून लग्न करायचा त्यांचा हेतू होता. आणा-शपथा होऊन सर्व नक्की झालं होतं. मुलीच्या आप्तेष्टांनाही तें समजलं. आणखी अशा वेळेला यांची आई वारली आणि मरतांना शपथ घालून आपली शेवटची इच्छा पुरी करण्याबद्दल तिनं यांना आज्ञा केली ! प्रेमळ जन्मदात्रीची शेवटची इच्छा पुरी व्हावी—एवढ्यासाठींच तिनं सांगितलेल्या मुलीशीं--म्हणजे माझ्याशीं—त्यांनीं विवाह केला ! 'आपली प्रेमनिराशा झाली, उत्साहभंग झाला, साऱ्या आयुष्यांतला आनंद नाहींसा झाला—एकंदरींत एज्युकेटेड पदवीधर पत्नीच्या सहवासांत आपण समाजकार्य उत्साहानं करणार होतों; पण सारं तिर-

पगडं होऊन आपला हा फुकट जन्म गेला ! !—' असं पुष्कळच त्यांनीं लिहिलं होतं. ''

एवढं सांगून ती गप्प बसली. निर्मला त्यांत अगदीं गुंगून गेली होती. तिचें डोकें त्या पाणीदार बाईबद्दलच्याच विचारांत गढून गेलें.

ही चूक कुणाची ? आईबापांनीं योग्य कुलशीलवन्त वराला आपली मुलगी दिली यांत त्यांची चूक तर नाहींच. वधूला वराबद्दल कांहींच माहीत नव्हतें ही वधूचीही चूक नाहीं. आणि स्वतःच्या आवडीनिवडींचा प्रश्नही विचारांत न घेतां—स्वसुखाची पर्वा न करतां नवऱ्यामुलानें आईची शेवटची आज्ञा पाळण्यांत कसूर केली नाहीं, हीही चूक कशी ? वडिलांचें आज्ञापालन ही चूक आहे का ? खात्रीनं नाहीं !—विचारांत निर्मला अगदीं गढून गेली. सहजगत्या कुठें तरी पहात होती. आणि तिची निश्चल आणि चिंतनमग्न मूर्ति ती फारच मोहक दिसत होती !

"कूऽऽऊऽऽऽ !" आगगाडीची कर्णकठोर शीळ ऐकू आली व त्या पाठोपाठच 'धऽक्—धऽक्—खाड्—खाड्—धड्—धड्'—असे आवाज ऐकूं आले व ती भानावर आली. तिनें खिडकीतून बाहेर पाहिलें. तें कुठलेंसें एक भिकार स्टेशन होतें व गाडी उभी रहाण्यापूर्वीची गर्जना करीत होती. तिनें गाडींत पाहिलें. त्या मारवाडी बायका केव्हांच उतरून गेल्या होत्या. कोंपऱ्यांतली म्हातारी अजूनही पेंगतच होती. आणि 'ताई' कसलेंसें सामान बॅगमध्यें परत ठेवण्याच्या उद्योगांत होती.

" म्हणजे हें काय ! तुम्हांला फोटोही काढायला येतो !— "

निर्मला अधिकच चकित झाली.

" तर ! माझा उपजीविकेचा तोच धंदा आहे हल्लीं ! तुमची विचारमग्न मूर्ति फारच सुंदर दिसली म्हणून फोटो घेतला. राग नाहीं ना आला ? " ताईनें स्मितवदनानें प्रश्न केला.

" छे ! राग कसला त्यांत ? पण पुढें सांगा ना—" तिनें उत्तर दिलें. ताईनें हकीकत सुरू केली—

" आतां विशेषसं राहिलं नाहीं. त्या दिवशीं दिवसभर माझ्या डोळ्यांतून मनाविरुद्ध पाणी वहात होतं. शेवटीं तें त्यांच्याही दृष्टोत्पत्तीस आलं व 'काय झालं ?' म्हणून त्यांनीं प्रश्न टाकला. 'झालं कांहीं तरी ! नेहमींच बेपर्वा वागायचं. मग मला कांहीं झालं तरी आपल्या वाङ्मयसेवनांत व्यत्यय कशाला पाहिजे माझा ? आहें आपली घरांत— जेवतें, खातें, काम करतें. मला थोड्याच भावना आहेत ?—' त्यांना या माझ्या उत्तरानें कांहीं विशेष वाटलं असावं—ते मृदुस्वरांत म्हणाले, 'आत्मवृत्त वाचलंस ना ? म्हणूनच ! पण खरंखुरं तुला समजलं हें बरं झालं. आजवर मीं गुप्त ठेवलं व निष्कारण तुला क्लेश दिले ही माझीच चूक होती. पण उगीच खोटं प्रेम करणं मला जमत नाहीं त्याला काय करूं ? तुझ्याबद्दल मला आदर आहे, पूज्यबुद्धि आहे, कौतुक आहे. पण पत्नीविषयक विशिष्ट भावना मात्र नाहींत. अजूनही त्या मुलीबद्दलचे विचार माझ्या मनांतून जात नाहींत.'

" मी प्रयत्नानें डोकें शांत ठेवून विचारलें, 'मग ती कुठाय् हल्लीं ? लग्न झालं कां तिचं ?'

" ' छे ! छे ! ' उद्वेगानें ते म्हणाले, ' ती आजन्म अविवाहित राहणार आहे ! केवळ माझ्यासाठींच तिचा हा स्वार्थत्याग आहे. मुंबईला मास्तरीण आहे ती— म्हणूनच तर हें वाटतं— '

" मी मुद्दाम निर्विकारतेनें म्हटलें, ' पण समजा अजूनही तुम्हांला विवाह करणं शक्य झालं तर ती कबूल होईल का ? अन् तुम्ही तरी त्यामुळं सुखी व्हाल का ? '

" शून्य दृष्टीनें माझ्याकडे पहात ते उत्तरले—'अशक्य गोष्टींचा विचार करून निष्कारण शीण करून घेऊं नको. माझ्या या बोलण्यानें तुला दुःख होत असेल– मला क्षमा कर. पण आतां हें मनाचं दडपण यापुढें मला सहन झालं नसतं !' डोळ्यांतलं पाणी मान वळवून त्यांनीं चटकन् पुसून टाकलं, पण मला तें दिसलंच !

" मग लग्न करतांनाच हा विचार करायला हवा होता. मनाविरुद्ध लग्न करण्यांत काय अर्थ ? "

" माझ्या या प्रश्नाला ते म्हणाले— ' तीच तर चूक ! बापाची वनवासास जाण्याबद्दलची आज्ञा निमुटपणें पाळणाऱ्या रामाला मी दोषी समजत होतों. पण आईची मृत्युशय्येवरची आज्ञा पाळण्यांत मीं स्वसुखावर व तुझ्या सुखावर पाणी सोडलं. त्यामुळें मीही दोषी ठरलों आहें. '

" मीं उद्विग्न व खिन्न स्वरांत म्हटलें, ' उपयोग काय दोष देऊन स्वतःला ? आईला मरतांना सुख देण्यासाठीं दुसऱ्या एका निरपराध बालिकेच्या जन्माची कवडीमोल किंमत केलीत त्यांत कितपत पुण्य लागलं ? असलं आज्ञापालन म्हणजे मूर्खपणाच आहे शुद्ध ! एक

बायको असतांना दुसरी खुशाल करावी. अशक्य नाहीं तें—'

" 'अऽऽशऽक्य नाऽहीं ?' चाचरत म्हणाले ते. 'पण एवढं धाडस कसं होईल ?'

" 'म्हणजे केवळ नाइलाज म्हणून तुम्ही हें रुक्ष जीवन आणि निष्प्रेम संसार चालवितां आहां तर–' माझा स्वर अत्यंत कठोर होता. ते उत्तर देऊं शकले नाहींत. माझी मात्र खात्री झाली कीं शक्य झाल्यास अजूनही त्या मुलीशीं लग्न करून संसार करण्याची त्यांच्या मनाची तयारी आहे. मी असतांना ते सुखी होणें शक्यच नव्हतें. माझ्या वियोगांतच त्यांचें सुख आहे हें मला कळून चुकलें. विचार कर कर केला अन् दुसरेच दिवशीं आपण होऊन मीं गृहत्याग केला ! लोक मला वाईट म्हणतात—म्हणूं देत ! मला मात्र त्यांच्या सुखाचा मार्ग मीं निष्कंटक केला हें समाधान वाटत असतें. मुंबईला आल्यानंतर लौकरच माझा जम हालविपत्तीनें बसला. मजेनं शिक-लेली फोटोग्राफीची कला ऐनवेळीं कितीतरी उपयोगी पडली !"

अगदीं उदासीन हास्य तिच्या मुद्रेवर झळकलें. निर्मलेनें विचा-रलें,— "पण मग केलं का त्यांनीं पुन्हां लग्न ? तुम्ही अशा तऱ्हेनं पोट भरतां हें त्यांना माहीत आहे का ?"

"दुसरं लग्न केलं तर ! त्यांची नवी बायको नुकतीच पाहिली मीं. फारच चांगल्या, मनमोकळ्या स्वभावाची अन् सुंदर आहे. खात्रीनं ते आतां सुखी असतील. कुठंही असोत; सुखी असोत म्हणजे झालं ! देवाच्या दयेनं माझाही धंदा ठीक चालला आहे. बहुतेक त्यांना माहीत असेल. नसलं तरी लौकरच माहीत होईल

यांत मुळींच शंका नाहीं." हंसत हंसत ताईनें उत्तर दिलें.

"त्यांचं नांव नाहीं सांगितलंत अजून! काय नांव! कुठं असतात ते!" निर्मलेची वाढती उत्सुकता पाहून ताईला हंसूं आलं व नांव विचारतांच मनांत नसतांना तिचे गाल आरक्त झाले.

हंसून ती म्हणाली, "नांव कसं सांगूं मी? बऱ्याच आहांत कीं तुम्ही! आपलं तर अजून नांवगांव देखील सांगितलं नाहींत अन् माझीच एवढा वेळ टकळी सुरू होती! आतां तुम्हीच आधीं सांगा. हं, कुणाच्या पत्नी आपण? लाजतां काय अशा? सुशिक्षित ना तुम्ही?"

शेवटलें वाक्य ऐकून निर्मला मोठ्यांदा हंसली. "वाटते खरी लाज! का कुणास ठाऊक?" ती उद्गारली. नंतर मनाचा मोटा हिय्या करून ती म्हणाली, "'सुप्रभात' मासिकाचे संपादक—आहेत ऐकून माहीत? प्रख्यात लेखक आहेत. नलिनीकान्त श्रीधर नेने! मला स्टेशनवर पोंचवायला आले होते ते. झालं? अगदीं सुशिक्षित तऱ्हेनं नांव घेतलं हं मीं. आतां तुम्ही घ्या नांव—अन् तुमचा पत्ताही द्या. आम्ही फोटो काढवून घेत जाऊं तुमच्याकडून. फोटोसीन्स् वगैरे जरूर 'सुप्रभात'ला देत चला. 'संपादक' अत्यंत गुणग्राहक आहेत."

"होय का?" या ताईच्या प्रश्नांत कुचेष्टेचा स्वर मिश्र होता.

"अगबाई! आलंच हें माटुंगा स्टेशन" झटपट सामान आंवरून मुलीला बोटाशीं धरून त्या दाराशीं उभ्या राहिल्या व दादरला उतरल्या. उतरतांना 'ओळख ठेवा हं' असें सांगून त्यांनीं दोन

छापील कार्डें तिच्या हातावर ठेविलीं.

माणसांच्या गर्दींत ती अदृश्य होईतोंवर निर्मला तिकडे पहात होती. गाडी चालू झाल्यावर भानावर येऊन तिनें सहज कार्डें पाहिलीं. ताईचा मुंबईचा पत्ता व तिच्या यजमानांचाही पत्ता छापील अक्षरांत त्या कार्डांवर होता—

| | |
|---|---|
| सौ. नलिनी नेने, | नलिनीकांत श्रीधर नेने, |
| 'माणिक' आर्ट स्टूडिओ, | संपादक, 'सुप्रभात' मासिक, |
| विलास व्हिला, फर्स्ट फ्लोअर, | सुप्रभातकार्यालय, |
| दादर, मुंबई. | सदाशिव पेठ, पुणें. |

हीं दोन्ही कार्डें वाचून निर्मलेच्या डोक्यांत चक्क प्रकाश पडला! आतां सौ. नलिनीबाईबद्दल कोणकोणत्या भावना तिच्या गोंधळलेल्या मनांत आल्या ह्याचें मला नीटसें वर्णन करतां येत नाहीं. तेवढें अजमावण्याइतकी कल्पनाशक्ति वाचकांच्याजवळ असेलच!



# अभागिनी



भाईसाहेब हे माझे मावसभाऊ. त्यांनीं मेडिकल कोर्स घेतला होता व म्हणून त्यांच्या खोलींत तो सांगाडा एका कोंपऱ्यांत उभा करून ठेवलेला असे. मला त्या हाडांच्या सांपळ्याबद्दल विलक्षण कुतूहल वाटे. तासन्तास मी त्याकडे टक लावून बसें. त्याबद्दल माझ्या मनांत नाना तऱ्हांचे विचार येत. तो सांपळा स्त्रीचा असावा कीं पुरुषाचा, त्याचें वय काय असेल, वगैरे गोष्टींवर विचार करकरून मी असें ठरवलें होतें कीं तो एका तरुण स्त्रीचा असावा. असें मला कां वाटे हें माझें मलाच कळत नव्हतें.

त्या सांपळ्यांत सौंदर्य तें काय असणार! उलट बापू व केशव यांना त्याची ‘ बागुलबुवा ’ म्हणून भीति वाटे. सौंदर्याचें एकच लक्षण म्हणजे दांत तेवढे सांपळ्यांत दिसत व ते मात्र अगदीं हारीनें, बारीक व पांढरेशुभ्र असे होते. जेव्हां तो सांपळा एका सजीव देहांत वास्तव्य करीत होता तेव्हां हेच दांत कुंदकळ्यांप्रमाणें शोभत असतील. परंतु आतां ती दांतांची कवळी कितीतरी भेसूर दिसत असे! नेहमीं कांहीं कांहीं प्रश्न मी त्या सांपळ्याबद्दल भाईसाहेबांना विचारी; पण ते हंसून म्हणत—“ तुला त्या सांपळ्याशीं काय करायचंय्! मी अभ्यासासाठीं आणला आहे, त्याचा पूर्व

इतिहास मला तरी काय माहीत बरं ! " तरीपण सांपळ्याचे विचार माझ्या डोक्यांत घोळतच असत.

रात्रीचीं जेवणें झाल्यावर भाईसाहेबांच्या खोलींत मी, दादा, ताई, कारयात्या, माई अशीं रोज गप्पा मारीत असूं. एकदां भाईसाहेब कांहींतरी एका रोग्याची माहिती सांगत होते. " तो रोगी माझा फार मित्र बनला आहे व त्याच्याजवळचा हा सांपळा त्यानें मला अभ्यासासाटीं दिला आहे " हेंही एक वाक्य त्या माहितींत होतें. मग मात्र माझ्या डोक्यांतले सांपळ्याचे विचार जाईनात. साडेनऊ वाजले. मी जाऊन निजलें पण झोंप लागेना. मच्छरदाणीच्या सभोंवार कोणी हळुहळू फिरत आहे असें मला वाटूं लागलें. हळूच माझ्या पायथ्याशीं कोणसें येऊन बसलें आहे असें मला वाटलें व मीं तिकडे पाहिलें.

बावीस वर्षांची एक सुंदर युवती माझ्या अंथरुणावर बसली होती ! मला भीति वाटूं लागली हें तिच्या लक्ष्यांत आलें वाटतें—! कारण ती हंसून म्हणाली, " मालुताई, मला भितेस ना ? " हंसतांना मला तिचे ते कुंदकळ्याप्रमाणें बारीक दांत दिसले. एकदम मला सांगाड्याची आठवण झाली. सांपळ्यांतले ते नाजूक दांत अगदीं अस्से होते. तो तर सांपळा ! मग त्या कोण ? म्हणजे ? मी भीतीनें डोळे अगदीं घट्ट मिटले ! " मला माहिती आहे—" त्या मंजुळ स्वरांत म्हणाल्या, " माझी तुला कां भीति वाटतें ! पण जरी सांपळा भेसूर असला तरी मी भेसूर दिसतें कां सांग पाहूं ! मग माझी कां तुला भीति वाटते ! मी तर तुला माझी हकीकत सांगायला

म्हणून आलें. सांगूं ना मग ?"

" हं सांगा," हळूंच मीं म्हटलें. अजून मला भीति वाटत होती.

× × ×

" मैनापूर नांवाचें एक खेडें होतें, " त्यांनीं सुरवात केली— " तेथें आम्ही रहात होतों. आई, बाबा, मी अन् नली एवढींच माणसें आमच्या कुटुंबांत होतीं. माझ्याकडे पाहून नेहमीं आईच्या डोळ्यांत अश्रू उभे राहात व बाबांची मुद्रा दुःखीकष्टी होई' कारण— " मध्येंच त्यांचा आवाज फार सद्गदित झाला आहे असें मला वाटलें. किंचित् थांबून त्या पुढें म्हणाल्या, " पति म्हणजे काय ही जाणीव होण्याच्यापूर्वीच माझ्यावर वैधव्याची कुऱ्हाड कोसळली होती. मी त्या वेळीं इतकी लहान होतें कीं लग्न झालें व मिरवणुकी निघाल्या एवढेंच मला आठवत होतें !

" माझ्या सासरची गरिबी होती, आणि माहेरींसुद्धां काय श्रीमंती थोडीच होती ! पण एवढी हलाखी नव्हती इतकेंच ! पती वारल्यानंतर तो माझाच पायगुण म्हणून सासऱ्यांनीं एका शब्दानेंही माझी विचारपूस केली नाहीं. बरोबरच आहे. पती वारल्यानंतर पत्नीची विचारपूस करण्याची जरूर काय " अत्यंत खिन्नपणानें हंसून त्या पुढें म्हणाल्या—" मी दुर्दैवी आहें हें मला कळल्यानंतर माझी आनंदी वृत्ति पार नाहींशी झाली. फार हंसणेंसुद्धां मीं वर्ज्य केलें. परमेश्वराचें भजनपूजन व सदाचार यांत आयुष्य घालवण्याचा मीं संकल्प केला.

" देव पाठीस लागला कीं हात धुवून लागतो. प्लेगच्या साथींत माझे आईवडील दोघेंही देवाघरीं गेलीं व या अफाट जगांत मी व

माझी धाकटी बहीण नलिनी एवढ्याच दोघी असहाय जीवन कंठूं लागलों. नलिनी यावेळीं दहा वर्षांची होती व मला सोळावें वर्ष होतें. बँकेंत आम्हां दोघींच्या नांवावर मिळून ३००० रुपये होते. त्याच्या व्याजावर आमचा निर्वाह होई.

" जसजशी नलिनी मोठी होत चालली, तसतशी एक नवीन काळजी मला चैन पडूं देईना. नलिनी आतां 'लग्नाला योग्य जाहली' असल्यानें तिला अनुरूप वर पहायला हवाच होता. एकदां मला वाटे—'कांहीं नाहीं ! नसू दे लग्न ! लग्न करून माझें काय कल्याण झालें आहे तर तिचें होईल !'—पुन्हां वाटे—'सगळ्यांचींच नशिबें सारखीं नसतात. जनरहाटीला अनुसरून लग्न केलें तर बरें; नाहीं-तर समाजाची कठोर टीका सहन करण्याचें तरी आपणांस धैर्य आहे का ? बोलूनचालून मी एक असहाय अबला. मी तरी तिचें जन्म-भर रक्षण करायला समर्थ आहें का ? ' " किंचित् विसांवा घेऊन त्यांनीं आपली हकीकत पुढें चालू केली—" ह्या कामांत माझ्या-पासली थोडीबहुत असणारी शिल्लकही पार झाली. नाना तऱ्हांचे अप-मान–दुरुत्तरें हीं माझ्या लाडक्या बहिणीसाठीं मला सहन करून घ्यावीं लागलीं. पण त्याचें काय ! मला तिच्याशिवाय कोण होतें ? अन् मुलीला स्थळ शोधण्यांत मानापमानाचें गाठोडें बरोबर बाळगून कसें चालेल ?

" वडिलांच्या कांहीं सज्जन स्नेह्यांच्या मदतीनें मला एका स्थळाची माहिती समजली. सर्व बाजूंनीं तें स्थळ छान होतें. पण...पण एक अट होती. तीन हजार हुंडा पाहिजे होता. बँकेंत

आम्हां दोघींचे मिळून तीन हजार रुपये होते. पण त्याच्या व्याजावरच आम्ही जिवंत होतों ! ते सारेच देऊन मीं कशावर आयुष्य काढायचें हाही प्रश्नच होता. पण तीन हजार खर्च केले म्हणजे तिच्या जन्माची ददात मिटत होती. माझा जन्म आतां कवडीमोलच होता. पण नलीचें तरी जन्माचें कल्याण होऊं दे—असा विचार करून सख्ख्या बहिणीसाठीं मीं स्वार्थावर पाणी सोडलें व बँकेंतले सर्व रुपये काढून नलीसह मेहुण्यांना अर्पण केले. लग्नसमारंभ पार पडला व माझी नलिनी मोठ्या मानसन्मानानें सासरीं गेली. माझ्या जन्माचें सार्थक झालेंसें मला झालें ! " त्या दीर्घ निःश्वास टाकून म्हणाल्या—" तुला कंटाळा तर नाहीं ना आला ? आतां कांहीं फार सांगावयाचें नाहीं. माझी ही कर्मकथा आतां संपतच आली आहे—" थोडेंसें थांबून त्या म्हणाल्या—

" हुंड्यादाखल सारे पैसे मी देऊन बसलें. पण पुढें माझी वाट काय ? आतां व्याज कुठलें ? खावयाचें काय ? हे प्रश्न डोळ्यांसमोर उभे राहिले. नलिनीच्या घरीं राहणें मला पसंत नव्हतें. स्वातंत्र्य व पारतंत्र्य यांतला फरक मला कळत होता. शाळेंत एका पंधरा रुपयांच्या जागेसाठीं मीं अर्ज केला व नशिबानें ती मिळालीहि. दहा रुपयांत जेमतेम चालवून ५ रुपये मी शिल्लक टाकीत होतें. लुगडीं फाटलीं होतीं तीं मी वर्षाअंतीं जमलेल्या पैशांतून घेणार होतें. एवढ्यांत नलिनीला कांहीं दिवस गेल्याचें कळलें व वर्षाअंतीं तिचे बाळंतपणाचेही दिवस येतात हेंही लक्ष्यांत आलें. बोलूनचालून दरिद्री मी ! मी कसली तिला बाळंतपणासाठीं आणवणार ?

" मला वाईट वाटलें. मीं बारशाला जायची तयारी केली. वर्षाचे ६० रुपये जमले होते. २५ रुपयांत नलीला लुगडें व मुलाला कपडे अन् पंचवीस रुपयांची सोन्याची नवीन धर्तीची नेक्‌लेस न् उरलेल्या दहा रुपयांत मला दोन पातळें अशी मीं खरेदी केली. मी बारशाला गेलें. मुलाचें नांव ' रत्नाकर ' ठेवलें होतें. मी थोडे दिवसच तिथें राहिलें. तेवढ्यांत एक दिवस रत्नाला फिट् येऊन त्यानें राम म्हटला ! मी आल्यानें—माझ्या पायगुणानेंच असा अशुभ प्रकार झाला अशी साऱ्यांची समजूत झाली ! सारींजणं—प्रत्यक्ष माझी नलीसुद्धां—माझा तिरस्कार करूं लागली ! " त्या सांगतां सांगतां जरा थांबल्या. त्यांच्या त्या सुंदर काळ्याभोर डोळ्यांतून या वेळीं सारख्या अश्रुधारा गळत होत्या. त्यांचा आवाज फारच सद्गदित झाला. डोळे पुसून त्या म्हणाल्या—" ज्या माझ्या नलीसाठीं माझ्या सर्वस्वाचा मीं त्याग केला, जिच्यासाठीं माझ्या खाण्यापिण्याची, कपड्यालत्त्याची, कष्टाची किंवा मानापमानाची मीं पर्वा केली नाहीं तिलाच माझा तिरस्कार वाटावा याहून दुःखाची गोष्ट कोणती ?—

" पैन्पै करून जमवलेली रक्कम मीं तिच्यासाठींच खर्च केली होती. तिचा मुलगा मरावा असा माझा हेतु असणं शक्य तरी होतं का ? मला विचारच करवेना. ताबडतोब मी मैनापुरास निघून आलें. येतांना कुणीही मला अडथळा केला नाहीं ! भगिनीप्रेमाचा असा कटु अनुभव मला आला."

मंदस्वरांत त्या पुढें म्हणाल्या—" दुसरे दिवशीं मला खूप ताप

आला. डॉक्टरांनीं ब्रेनफीव्हर असल्याचें सांगितलें. पुन्हां एक पत्र पाठवून वेड्यासारखें नलीला भेटायला बोलावलें. माया वेडी म्हण-तात ती अशी ! नलिनीच्या नवऱ्याचें उत्तर आलें—' त्या भिकार खेड्यांत तिचे इतके दिवस गेले ते पुरेत. तुम्हीसुद्धां नुकत्याच भेटून गेला आहांत. एवढ्यांत भगिनीप्रेमाचा कां उमाळा यावा कळत नाहीं. धाडण्यास सवड नाहीं.' मग मात्र माझा ताप भडकला व त्याच दिवशीं रात्रीं मीं इहलोकचा निरोप घेतला ! मरतांना मनः-पूर्वक देवाची प्रार्थना केली कीं माझ्या नलीला व तिच्या भावी अपत्यांना उदंड आयुष्य दे व माझ्याप्रमाणें कुणाच्याही पायगुणाची बाधा त्यांना होऊं देऊं नकोस."

त्या खिन्नतेनें म्हणाल्या, "संपली माझी हकीकत. ती ऐकून तुलाही माझा तिरस्कार वाटत नाहीं ना ? मालुताई, कोणत्याही स्त्रीचा केवळ ती 'विधवा' म्हणून तूं तरी तिरस्कार करूं नकोस. विधवांनाही हृदय असतें— होय ना ?" बोलतां बोलतां ती मूर्ति भाईसाहेबांच्या खोलींत शिरली व त्या हाडाच्या सांपळ्याशीं जाऊन त्यांत पूर्णपणें मिसळून अदृश्य झाली.

× × ×

आज त्या स्वप्नाला—हो, स्वप्नच तें—कितीतरी दिवस होऊन गेले. पण त्यांतला शब्द न् शब्द माझ्या लक्ष्यांत आहे. विसरून जाण्यासारखें तें स्वप्न नव्हतेंच मुळीं ! आतां त्या सांपळ्याबद्दल एक तऱ्हेचा मला आदरच वाटतो ह्यांत काय आश्चर्य !



# करमणूक

" वा ! मोठी मजा आहे बुवा ! नुसतें खोटें नांव सांगितल्यानें या नायकाला इतका अप्रतिम फायदा झाला म्हणायचा ! पण ही कादंबरी ! सत्यसृष्टींत असें केलें तर ! "

बापूसाहेब चितळे ज्या वेळीं वरील स्वगत उद्गार काढीत होते ती वेळ फार रम्य होती. सृष्टिसौंदर्य, रजनी, निशानाथ, तेजस्वी तारकासमूह, कौमुदी वगैरे जाड जाड शब्द गाळून तिचें साधें वर्णन करावयाचें म्हणजे पहांटेचे साडेचार वाजले होते. बापूसाहेब हे अस्सल फॅशनेबल कॉलेजियन तरुण असल्याचें त्यांचे केंस व इतर गोष्टींवरून सहज लक्षांत येत होतें. पुण्याहून ते धुळ्याला निघाले होते. वाटेंत चाळिसगांवास गाडी बदलून नव्या गाडींत थर्ड क्लासांतच एक चांगली झकास जागा पाहून त्यांनीं अंथरुण पसरलें व तानचार उशांच्या साह्यानें अर्धवट कलत्या पोझिशनमध्यें बसून त्यांनीं बरोबरची रोमँटिक कादंबरी वाचायला सुरवात केली. थोड्या वेळानें कादंबरी मिटून ते नुसताच कसला तरी विचार करण्यांत मग्न झाले. मधून मधून त्यांच्या स्वर्णवलयांकित नेत्रांत व एकंदर चर्येवर मोठें आनंदाचें स्मित चमके. यावरून ते विचार अगदीं गोड असावेत असें दिसत होतें.

× × ×

त्यांच्या आनंदाचें कारण समजायला फार दूर जायला नको. ते धुळ्याला स्वतःच्या लग्नासाठीं चालले होते, एवढें कळलें तरी त्यांच्या त्या सौख्यद विचारांचें अनुमान होईल. त्यांनीं मुलीला पुण्यांतच पाहिलें होतें व ती सुंदर, शिकलेली, लाजाळू आहे असें त्यांचें मत होतें. एकंदरींत त्यांना ती पूर्ण पसंत होती व भावी प्रियेबद्दलच त्यांचे विचार सुरू होते.

गाडी सहा वाजतां सुटावयाची होती. बापूसाहेब आपल्या त्या सुंदर विचारसौख्यांत इतके गढून गेले होते कीं, खिडकींतून एक तरुणी आपल्याकडे चांगलीं पांच मिनिटें न्याहाळून पाहून गेली हें त्यांना कळलेंसुद्धां नाहीं ! ती तरुणी एकटीच नव्हती. तिच्याबरोबर सुमारें सोळा वर्षांची एक काळी, कुरूप, देवीचे वण असलेली, लठ्ठ, अशी दुसरी तरुणी होती व सुमारें बत्तीस वर्षांचा एक गृहस्थही होता. स्टेशनवरच्या बाकावर ही मंडळी बसली होती. त्या तरुणीचें नांव वासंती होतें. ती म्हणाली—" ते खात्रीनें बापूसाहेब चितळेच आहेत ! कालिंदीला बघायला हेच आले होते ! आणि आपण जसे कालिंदीच्या लग्नाला निघालों आहोंत तसेंच तेही पण तिच्यांच अन् स्वतःच्याही लग्नालाच निघालेले आहेत."

" तुला ओळखतील तर मग ! " ती काळी तरुणी–सिंधू–म्हणाली.

" बरीच फॅशनेबल अन् रोमँटिक स्वारी दिसते आहे." वसंतराव म्हणाले. " अं !...असं करावं..."

" मोठा त्रासदायक स्वभाव बाई इकडचा ! आतां एवढा

विचार करकरून त्या बिचाऱ्याचं कांहींतरी काढायचं असेल! बिचारा या गाडीनें उगीच आला!" वासंती उद्गारली.

"बरं...बरं! एवढा नको मेहुण्याचा कैवार घ्यायला! पण जरा मजा करूं या जांवईबापूची! काय ग, कालिंदीला बघायला हे आले तेव्हां ही सिंधू होती का?"

"छे! आम्ही साऱ्याच दाराआड होतों. ते मलाही ओळखणार नाहींत मी नवऱ्यामुलीची मोठी बहीण म्हणून." वासंती म्हणाली.

"हें फार उत्तम झालें बुवा! आतां असें करूं—" वसंतरावांनीं आपला बेत त्या दोघींना समजावून सांगितला. त्याला त्या दोघींनीं हंसत कबुलीही दिली.

× × ×

पांच वाजण्याच्या सुमारास ही मंडळी बापूसाहेबांच्या डब्यांत शिरली. बिचाऱ्या बापूसाहेबांच्या गोड तंद्रीचा असा भंग झाला नसता तर ती केवढा वेळ लांबती कोण जाणे! बापूसाहेबांना सुद्धां या पाहुणेमंडळींचा किंचित् राग आला, पण वसंतरावांनीं ताबडतोब साखर पेरण्यास सुरवात केली.

"कांहीं अडचण तर होत नाहीं ना आम्ही आल्यानें? कुठें जायचें आहे आपणांला?"

"छे...छे! अडचण कसली? सारा डबा मोकळाच आहे. जरा बरेंच झालें बोलायचालायला! मी धुळ्याला निघालों आहे. आपल्यालाही तेथेंच उतरायचें असेल?" बापूसाहेबांनीं विचारलें.

"होय. कुठें उतरणार आपण? नांव काय आपलें?" वसंत-

रावांनीं अनोळखी गृहस्थाची ओळख करून घ्यायच्या उद्देशानें प्रश्न विचारण्याचा आव आणला होता.

" माझें नांव होय !" बापूसाहेबांच्या त्या घाऱ्या डोळ्यांत एक मजेदार चमक दिसली. त्यांना कादंबरींतल्या नायकाची आठवण झाली. त्याच्याप्रमाणें आपणही खोटें नांव सांगितलें तर काय गंमत होईल ! ह्या मंडळींना कल्पनासुद्धां होणार नाहीं हें नांव खोटें म्हणून ! नायकासारखा आपलाही कांहीं फायदा होतो का पाहूं या. क्षणार्धांत ह्या विचारचक्रांतून गिरकी घेऊन आलेल्या बापूसाहेबांनीं उत्तर केलें, " माझें नांव मधुकर वासुदेव गोरे ! मला भाऊसाहेबही म्हणतात. "

आमच्या त्रिवर्ग मंडळींना चेहऱ्यावरील हंसूं दाबतांना पुरेवाट झाली. बापूसाहेबांनीं आपल्याकडून शिताफीनें दुसरें नांव सांगितलें, पण त्यांची पुरी माहिती त्यांना होती ही त्यांना काय कल्पना ! एवढेंच नव्हे तर त्यांच्या बॅगवरही–'विश्वास दिनकर चितळे'–अशीं अक्षरें होतीं हेंही त्यांच्या लक्षांत आलें नाहीं !

" मग तुम्हांला धुळ्याच्या चितळे वकिलांची माहिती असेल ! " वसंतराव त्यांच्या चर्येकडे सूक्ष्म दृष्टीनें पहात म्हणाले.

" होय. " बिलकूल न अडखळतां चटकन् बापूसाहेब म्हणाले. " त्यांचा मुलगा बापू याचें लग्न आहे. माझा तो फार जिवलग मित्र ! मला वेळ नाहीं तरी दोनच दिवसांची सवड काढून मी त्याच्याच लग्नाला चाललों आहें. तुमची कुठली ओळख तिथें ! कीं नातेंबितें आहे ! "

बापूसाहेबांच्या अभिनयकौशल्याची मनांतल्या मनांत तारीफ करीत वसंतरावांनीं वासंती व सिंधू यांना नेत्रसंकेत केला. त्यांनीही तसल्याच नेत्रपल्लवींत त्याचें उत्तर दिलें.

" आम्हीदेखील त्यांच्याच लग्नाला चाललों आहोंत. पण तुम्ही मुलाकडचे अन् आम्ही मुलीकडचे एवढाच फरक. ' आमच्या ह्या ' म्हणजे नवऱ्यामुलीची वडील बहीण हो ! अग कालिंदी, आत्तांच एवढी लाजून कशाला बसते आहेस ? " त्या कुरूप मुलीकडे–सिंधूकडे–पहात वसंतराव म्हणाले. " अग, हे कांहीं बापूसाहेब चितळे नाहींत लाजायला ! हे त्यांचे मित्र भाऊ-साहेब गोरे ! "

बापूसाहेब चमकले ! हें काय नवीनच ! हीच का कालिंदी–आपली नियोजित वधू ? आपल्याला पुण्याला दाखविलेली कालिंदी ही नव्हे कांहीं ! ती तर कितीतरी नाजूक, गौरवर्णीय, रेखीव होती ! अन् ही ! कुठें इंद्राचा ऐरावत अन् कुठें...! हें काय गौडबंगाल ? तसाच धीर करून भाऊसाहेब गोरे वसंतरावांना विचारूं लागले, " काय हो–पण रागावूं नका हं–आपलं स्पष्ट विचारतों–बापू तर आपल्या भावी पत्नीची– ती फार सुंदर, विनयशील, बांधेसूद, अन् अमुक अमुक–असल्या प्रकारचीं किती हवीं तेवढीं वर्णनें करीत होता–अन् हें प्रकरण अगदींच उलट दिसतें आहे, हें कसें ? "

भाऊसाहेबांच्या माहिती काढून घेण्याचें वासंतीला कौतुक वाटलें. ती म्हणाली, " मी सांगतें तें ! किनई, कालिंदी आमची लहान-पणापासूनच काळी ! त्यांत देवी आल्या. अन् त्यामुळं कुठं जमेना

लग्नाचं ! शेवटीं युक्ति केली एक—अन् त्या युक्तीनें तुमचे बापूसाहेब सोळा आणे फसले अगदीं ! त्यांना कालिंदी म्हणून दुसरीच एक सुंदर मुलगी दाखवली अन् त्यांनीं ती पसंत केली ! त्यांचे आईबाप बिचारे सज्जन ! मुलाला मुलगी पसंत आहे तर आमचीही पसंती आहे, असें त्यांचें पत्र आलें. मग काय ! बाकीच्या गोष्टी ठरायला किती उशीर ! आतां खरी खरी कालिंदी म्हणजे ही. माझं लग्न झालं तेव्हांपासून तीन वर्षे झालीं. माझ्याजवळच चाळिसगांवाला असते. तुम्ही जसे ऐन वेळेवर लग्नाला जात आहांत तसे आम्ही या नवरीसुद्धां अगदीं ऐन वेळेवर जाणार ! अन् एकदां अक्षता पडल्या कीं सुटलों आम्ही ! मग तुमचे ते बापूसाहेब किती चिडले अन् कांहीं जरी झालं तरी करतात काय ? कालिंदीचं मात्र नशीब खरं म्हणून असा नवरा तिला मिळतोय् ! काय कालिंदी ! ”

यावर कालिंदीनें हंसून जो कांहीं मुरका मारला कीं वा ! बिचारे बापूसाहेब ! आपली भावी प्रिया व तिचें लाजणें पाहून त्यांना काय वाटलें असेल याची कल्पना वाचकांनींच करावी ! वासंतीचें तें बोलणें व त्याबरोबरच आपली झालेली फसवणूक यांचें शब्दचित्र ऐकतांना हळुहळू त्यांच्या सुंदर मुखमंडलावर क्रोधाचें आवरण चढत होतें. आणि तें पाहून वसंतराव व वासंती यांना अगदीं मजेच्या—आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या. कालिंदीनें तर एकसारखें त्यांच्याकडे पाहून तीक्ष्ण दृष्टीचे प्रेमाचे बाण सोडावयास सुरवात केली होती. बापूसाहेब या सर्व प्रकारानें चिडले ! संतापून त्यांनीं विचारलें, “ अन् मी माझ्या मित्राला असा तुम्हांला फसवूं देईन काय ?

मी गेल्याबरोबर बापूसाहेबांना हें सारें सांगून लग्न मोडून टाकतों. छान फसवाफसवी चालली आहे ! जगांतील भामटेशाहीचा हा एक नमुना ! दुसरें काय ! ”

“ पण आज आतां गेल्याबरोबर तुमची अन् नवऱ्यामुलाची भेट एवढं सगळं सांगण्याइतकी आम्ही होऊंच देणार नाहीं ! मीच येऊन बसतों सारा दिवसभर तिकडे ! उद्यां सकाळीं तर लग्न ! अन् त्यांतून सांगितलंत, तरी खरं मानायला आधार काय ? कारण त्यांना दाखविलेली कालिंदी आतांही ‘ लग्नाला ’ म्हणून धुळ्याला गेलेलीच आहे. ती पुन्हां दाखवूं अन् ही सारी चेष्टा केली असें म्हणूं. मग ही चेष्टा नव्हे म्हणायला काय साधन आहे तुम्हांला ? ” वसंतरावांनीं शांतपणें विचारलें.

बिचारे बापूसाहेब या कोटिक्रमानें थक्कच झाले ! बऱ्याच खमंग मंडळींशीं गांठ आहे हें ते समजून चुकले; व हें आलेलें अरिष्ट कसें टाळावें, आईला काय सांगावें, वडील काय म्हणतील, ती दाखविलेली कोण तर, असे कसे फसलों आपण, वगैरे विचारांत ते गुंग झाले.

× × ×

मध्यें सर्व स्टेशनें जाऊन धुळ्याचें स्टेशन आल्याचें, ‘ काय, रावसाब—गाडी तय्यार है—चला. सामान समदं काढतों मी बिगीबिगी...” या शब्दांनीं त्यांना कळलें. त्यांनीं पाहिलें घरचा गडी गोंद्या होता तो. त्यांच्याबरोबरची मंडळी उतरून गेल्याचें त्यांना दिसलें.

घरीं गेल्याबरोबर लग्नाची अगदीं जय्यत तयारी बघून त्यांचें डोकें दुखूं लागलें. एका बाजूला जाऊन ते स्वस्थ आपल्या दुर्दैवाचा विचार करीत पडून राहिले. आईकडून आपल्या फसवणुकीची सारी हकीकत वडिलांना कळवून लग्न मोडावें असे त्यांच्या मनांत विचार सुरूं होते.

" बापू, कां रे बाळ असा निजला आहेस ? बरं कां वाटत नाहीं तुला ? किनई, सुशींनं चहा केला आहे तर तो वरच आणूं दे का खालीं चलतोस ? अन् आतां खालीं केव्हां बरं यायचं बापू ? " त्याच्याजवळ बसून प्रेमभरानें हळूहळू त्यांच्या अंगावरून हात फिरवीत मनुताई—त्यांची आई—त्यांना विचारूं लागल्या.

बापूला आईच्या मृदु शब्दांनीं कसेंसेंच वाटूं लागलें. आतां लग्न मोडायचें असें तिला कळलें तर त्या माउलीला काय वाटेल ? तिचा सारा उल्हास नष्ट होईल—पण आपल्या साऱ्या जन्माचें नुकसान होणार...! सांगावेंच...! हळूहळू बापूसाहेबांनीं गाडींतील सारी हकीकत आईच्या कानांवर घातली व आतां काय करावें म्हणून विचारलें.

" एवढंच ना ? " आई अगदीं हांसऱ्या मुद्रेनें म्हणाली. " तूं त्यांना खोटें नांव सांगून फसवायला बघत होतास. पण तूंच अगदी फसलास ! अरे ती वासंती अन् कालिंदी मला लहानपणापासून माहीत आहेत हो ! कालिंदी तर कशी नक्षत्रासारखी पोर ! अशी बायको मिळायला भाग्य पाहिजे बाबा ! वासंतीचा नवरा मोठा चेष्टेखोर माणूस आहे. त्यानं आपल्या स्वभावाप्रमाणं तुझी ही थट्टा केली !

मला वासंतीच्या आईबापांची फार चांगली माहिती आहे. तीं कशाला उगीच एकाद्याला फसवतील बरं ? देवमाणसं तीं ! बरं झालं माझ्यापाशीं बोललास तें. त्या वसंतरावांची एकदां चांगली खरडपट्टी काढायला सांगतें..."

अमृतवर्षाव होत असल्याचा बापूसाहेबांना भास झाला. कालिंदी-बद्दल आपल्या आईला इतकी माहिती असेल अशी त्यांना कल्पनाही नव्हती.

" कशावरून पण आई ?— हें खरं कशावरून ? "

" इश्श् ! बापू, माणसं बदलतात का ? आतां घाणा भरायची वेळ झालीय् अन् आतां मुलीकडल्या बायका येतील, त्यांत ती आगगाडींतील ' कालिंदी ' येईल तेव्हां तुझी खात्री होईल ! खरी नवरी कांहीं वरातीखेरीज येत नसते. काय बाई चमत्कार तरी ! " इतकें म्हणून तीं दोघें खालीं गेलीं.

थोड्या वेळानें आगगाडींतील ' कालिंदी ', वासंती व इतर बायका आल्या. वासंतीबाई बापूसाहेबांच्याजवळ येऊन म्हणाल्या, " काय, सांगितलंत का बापूला ? का त्याचं संकट टाळण्यासाठीं स्वतांच मुंडावळ्या बांधल्या ? या कालिंदीचं खरं नांव सिंधू आहे. अन् ही आपली माझी एक गरीब सोबतीण आहे हो ! माझी कालिंदी खरोखरच तुम्हांला नाकारणार नाहीं ! "

" छान फसवलंत पण— " हळूच बापू म्हणाले.

" खऱ्या नांवाची बॅग जवळ ठेवून खोटं नांव सांगणाऱ्या भाऊ-साहेबांनीच आम्हांला फसवलं ! आम्ही कशाला त्यांना फसवूं ? "

तितक्यांत कोठूनसें वसंतरावांनीं विचारलें.

× × ×

लग्नाच्या वेळीं अंतरपटाच्या आडून मोठ्या बारकाईनें खालीं पाहतां वधूचे पाय शुभ्र गोऱ्या रंगाचे पाहून आगगाडींतील कालिंदी ही नसून आपल्या कल्पनासाम्राज्यांतील सुकुमार सुंदरीच आपली पत्नी आहे अशी बापूसाहेबांची पुरी खात्री झाली.



# नशिबाची परीक्षा



हात पाहतां पाहतां सावळ्याचा चेहरा अतिशय गंभीर झाला, व तो हात सोडून वर आकाशाकडे पाहूं लागला.

" काय ! काय आहे नशिबांत ! बोल कीं. असा गप्प कां म्हणून ! का माझ्याच बाबतींत ज्योतिष कळेनासें झालें आहे ! " दिवाकरानें हंसून विचारलें.

" दिवाकर, तुमचा एक विश्वास नसला, तरी सबंध ज्योतिष-शास्त्राची चेष्टा करण्याचा कांहीं आपणांस अधिकार पोहोंचत नाहीं त्यामुळें ! तुम्ही चेष्टेंत विचारतां, पण मीं खरेंच सांगतों कीं आपल्या बाबतींत आपण कांहीं विचारूं नये व मी सांगूं नये हेंच बरें ! " सावळ्यानें गंभीरतेनें उत्तर दिलें.

" पण ज्योतिषाला नेमक्या चांगल्या घडणाऱ्या गोष्टी कळाव्यात हें आश्चर्यच आहे. तूं खुशाल सांग. मला मुळींच कांहींदेखील नाहीं वाटायचं. ज्या गोष्टीच्या खरेपणाबद्दल मन साशंक आहे..."

" साशंक कुठपर्यंत दिवाकर ! " मध्येंच सावळ्यानें विचारलें. " जोंपर्यंत प्रचीती आली नाहीं तोंपर्यंत. दिवाकर, कांहीं ज्योतिषी लबाड असले तरी हस्तसामुद्रिक हें शास्त्र कांहीं खोटें ठरणार नाहीं. आतां तुमच्या बाबतींत जर हें खोटें निघालें तर फारच उत्तम—"

" सावळ्या, इतके हजार वळसे घेण्यापेक्षां एकदम तुला माझा हात पाहून काय कळलं तें सांगून टाकीनास ? खरें तर खरें ! आपल्याला काय ? ज्योतिष समजावून घ्यायचं......"

" दिवाकर, इतरांप्रमाणें मला 'धनलाभ आहे, शंभर वर्षें आयुष्य आहे' वगैरे कल्पित भविष्यें सांगतां आली नसतीं काय ? पण मी ज्ञानलालसेनें या धंद्यांत पडलों. पोटासाठीं नव्हे. तेव्हां मी तरी खोटेंनाटें सांगणार नाहीं एवढी आपली खात्री असू द्या."

" अरे पण—ऐकूं दे तरी काय सांगतोस तें—" दिवाकरानें जरा रागावून म्हटलें.

" दिवाकर, आपल्या नशिबीं गृहसौख्य नाहीं. अनिष्ट भार्यायोग म्हणजे भार्येपासून आपणांस सौख्य होणार नाहीं असें मला दिसत आहे. जातों मी आतां." सावळ्या तेथून मंदगतीनें निघून गेला.

+ + +

" हें काय बापू ! आतां चांगलं शिकणंसवरणं झालं, नोकरी लागली, अन् आतां अजूनदेखील लग्न करायचं नाहीं म्हणतोस ? कितीतरी मुली सांगून येताहेत. इतके दिवस शिकणं होईतों लग्न करणार नाहीं म्हणत होतास. आतां कोणती सबब हुडकून काढली आहेस तें तरी ऐकूं दे."

" पण—आई—"

" पण नाहीं न् कांहीं नाहीं—आतां आम्ही वोंवं झालों आहोंत म्हातारीं पिकलीं पानं— एकुलत्या एक मुलाचं लग्न लौकर व्हावं असें कधींपासून वाटत होतं. पण तूं नाहीं ऐकलंस तें ! आतां वय झालं

नाहीं का अजून लग्नाचं ! कां करायचं नाहीं पण म्हणतें मी ? ”

“ उगीच... ” दिवाकराला सावळ्याचें भविष्य एकसारखें आठवत होतें व म्हणून त्यानें अजिबात लग्न करावयाचें नाहीं असें ठरविलें होतें. पण आईला तें सांगतां येईना. ज्योतिषावर आपला विश्वास नसला तरी मुद्दाम विषाची परीक्षा कशाला पाहायची असें दिवाकराला वाटे. आईनें कां म्हणून विचारतांच त्याला कांहीं सुचेनासें झालें. व ‘ उगीच ’ असें तो चटकन् बोलून गेला.

“ वा ! खूप चांगलं कारण आहे हो ! हें काय मला ठाऊक !” हंसत हंसत माई स्वयंपाकघरांत गेल्या. दिवाकर मुद्दामच चंद्रबळ आणतो आहे अशी त्यांची समजूत झाली.

× + ×

“ आपण काय लग्न करणार नाहीं असें ऐकलें ! मग जन्मभर काय करण्याचा आपला विचार आहे कळूं द्या एकदां ! कारण तरी काय ? विचारलें म्हणून कीं काय ? ” दुपारीं जेवतांना दिवाकरचे वडील करड्या व उपरोधिक आवाजांत त्याला विचारीत होते. दिवाकराला अद्याप वडिलांचा धाक व भीति वाटत होती. खालीं मान घालून तो गप्प बसला होता. “ मीं भाऊसाहेब इनामदारांची प्रभा तुमच्यासाठीं पसंत केली आहे. आपल्याला बापाची जर पर्वा असेल तर आपण ती मुलगी पाहून या ! पण जर कुणाची जरूर नसेल—लग्नच करणार नसाल—तर दाही दिशा मोकळ्याच आहेत ! अलीकडचीं मुलें ! मतस्वातंत्र्य म्हणे ! ”

अगदीं रागीट आवाजांत दिवाकरचे वडील असें म्हणाले.

बिचारा भित्रा दिवाकर! आपल्या रुद्रस्वरूप जनकासमोर एक अवाक्षरदेखील त्यानें काढलें नाहीं. आणि 'मौनं संमतिलक्षणम्' या न्यायानें लवकरच दिवाकरपंत स्वतःच्या मर्जीविरुद्ध इनामदारांच्या प्रभेशीं विवाहबद्ध झाले.

तें भविष्य सारखें दिवाकराच्या दृष्टीसमोर नाचत होतें. 'अनिष्ट भार्यायोग' हे शब्द सारखे त्याच्या कानांत घुमत होते. रात्रीचे दहा वाजले होते. दिवाकर आपल्या शय्यागृहांत प्रभेची मार्गप्रतीक्षा करीत होता. "काय चाललंय् ?" मंजुळ स्वरांत उच्चारलेला प्रभेचा प्रश्न त्याच्या कानीं पडला. प्रभेकडे तिरकस नेत्रांनीं पाहून दिवाकर मजेनें म्हणाला "अगदीं शंभर वर्षे आयुष्य आहे तुला. मीं तुझीच आठवण केली होती."

"काय बाई करायचंय् एवढं लांबरुंद आयुष्य?" प्रभेनें स्मितमुद्रेनें म्हटलें. "जें काय थोडेंबहुत आहे तेंदेखील देवानं आपल्याला द्यावं..."

"थोडेंबहुत म्हणजे?" दिवाकरनें कंपित स्वरांत विचारलें.

यावेळीं प्रभा हंसत नव्हती. उलट तिची मुद्रा गंभीर दिसत होती. "किनई," तिनें दिवाकराकडे निश्चल दृष्टीनें पहात उत्तर दिलें, "माझें आयुष्य फक्त अठरा वर्षांचें आहे असें एका ज्योतिष्यानें मला सांगितलें आहे, म्हणून मीं तसें म्हटलें—"

"काय म्हणतेस प्रभा? तुझा त्या गोष्टीवर विश्वास आहे? कितवं वर्ष आहे तुला आतां?" दिवाकराच्या आवाजांत घाबरटपणा पाहून प्रभेला कौतुक वाटलें.

" हें अठरावं वर्षच लागलं आहे मला ! कळेलच वर्षाच्या आंत--कां भीति कसली त्यांत ! आपल्याला काय ! एक सोडून शंभरजणी मिळतील— असं वाईट वाटून काय घ्यावं बरं ! " हे शब्द दिवाकराला नीट ऐकूं आले नाहींत. भविष्य अगोदर कळलें असून कां लग्न केलें बरें ! असें कुणीतरी एकसारखें विचारीत असल्याचा दिवाकराला क्षणोक्षणीं भास होत होता.

× × ×

" आज प्रभेला अठरावें वर्ष संपून एकोणिसावें लागणार ! देवा ! हें सर्व वर्ष पार पाडलेंस तसें फक्त आजचा दिवस— " सद्गदित कंठानें दिवाकर देवघरांत देवपूजा करतांना ईश्वराची मनोमय प्रार्थना करीत होता.

आज त्याला बराच आनंद झाला होता. अजून प्रभा सुरक्षित होती. आजचा दिवस संपला म्हणजे मी व प्रभा दोघेंही ज्योतिष शास्त्राच्या मगरमिठीतून सुटणार असें दिवाकराला वाटत होतें. हळूहळू रात्र झाली. दिवाकराचें डोकें दुखूं लागलें होतें. तें पाहून प्रभेनें विचारलें— " मेंथॉल चोळूं का ? त्यानं बरं वाटेल— कुठें आहे बाटली ? "

" राहूं दे ग—एवढं नाहीं कांहीं फार दुखत—"

" थोडंसं तर तेव्हांच राहील त्यानं ! सांगावी कुठं ठेवली आहे बाटली ती— आतां दोन मिनिटांत आणतें— उगीच कां त्रास करून घ्यायचा तो ! " असें म्हणून प्रभा उठलीच.

" मधल्या घरांतल्या भिंतीवर कपाटांत वरच्या खणांत आहे—

लवकर आण." दिवाकर म्हणाला. आपल्या यत्किंचित् डोकें दुखण्याबद्दल सुद्धां प्रभेनें तत्परता दाखवावी याची त्याला धन्यता वाटत होती.

" अयाई ग ! " प्रभेचा शोकविव्हल स्वर त्याला माजघरांतून ऐकूं आला. झटपट दिवा घेऊन तो तिकडे गेला तों त्याला काय दिसलें ? डावा पाय दोन्ही हातांत गच्च दाबून प्रभा खालीं बसली होती ! पुढें मेंथॉलची बाटली पडली होती आणि ती सारखी विव्हळत होती.

" चावलं हो मला कांहींतरी ! अगदीं किती आग व्हायला लागली आहे... "

प्रभेच्या ओरडण्यानें घरांतली सर्व मंडळी तेथें जमा झाली. काय झालें हें सर्वांना ताबडतोब दिसून आलें. अनेक उपाय झाले. पण प्रभेला चावलेला साप भयंकर विषारी असल्यानें कोणताही उपाय लागू पडला नाहीं. हळूहळू प्रभेला लहरी येऊं लागल्या. बिचारा दिवाकर ! ज्योतिषशास्त्राच्या अकल्पित घडामोडीचें हें हृदयविदारक दृश्य त्याच्यानें पहावेना. हळूहळू प्रभेचा आत्मा नश्वर देहाचा त्याग करून अनंताकाशांत विलीन झाला. याच वेळेला दिवाकराला दृष्टीसमोर शब्द दिसले ' अनिष्ट भार्यायोग ' ! प्रभेच्या अमृततुल्य सहवासाची व स्वर्गीय सद्गुणांची रोज आठवण करीत दिवाकर कंटाळवाणा वेळ काढीत होता !

प्रभेच्या मृत्यूनंतर जवळजवळ एक वर्ष दिवाकरानें लग्नाचें नांव देखील कुणाला काढूं दिलें नाहीं. पण एवढा श्रीमंत तरुण व अवि-

वाहित हें लोकांना कसें सहन व्हावें ? दिवाकरचे मित्र तर वरचे-वर त्याला कौटुंबिक सौख्याच्या खऱ्याखोट्या गोष्टी सांगून दुसरें लग्न करण्याबद्दल आग्रह करीत. दिवाकराच्या मनांतसुद्धां हळूहळू पालट पडूं लागला. प्रभा मेली ती आपल्या नशिबानें मेली नाहीं. तिचेंच आयुष्य कमी त्याचा दोष आपणावर कसा येतो ? आणि काकतालीय न्यायानें एखादी गोष्ट भविष्याशीं जुळली तरी सर्व आयुष्यभर एकाच भविष्याची प्रचीति येईल असें मानायला तरी काय आधार आहे ? असा विचार दिवाकर करूं लागला. ऐन पंचविशी—आणि निष्कारण लग्न करायचें नाहीं—सर्व आयुष्य एकलकोंडेपणानें काढा-यचें—छे ! कल्पनाच भयंकर !

लोकाग्रहास्तव दिवाकरनें लौकरच लग्न केलें.

× × ×

दिवाकराला लग्न करून आपण खरेखुरे सुखी बनलों असें वाटूं लागलें. त्याची पत्नी सुंदर होती, विनयशील होती, एवढेंच नव्हे तर लवकरच माताही बनणार होती.

मनुष्याला प्रथम पत्नीच्या अकालीं मृत्यूनें फारच धक्का बसलेला असतो. त्यामुळें दुसऱ्या पत्नीबरोबर वागतांना त्याचें हृदय साह-जिक ‘ नवनीतमिव कोमलम् ’ बनलेलें असतें. दिवाकरच्या दुखाव-लेल्या अधू हृदयाला या नूतन द्वितीय पत्नीबद्दल फारच चिंता वाटे. जरा कुठें प्रकृतींत असें नाहीं असें म्हटलें कीं त्याचा जीव खालींवर होई. हृदयाचे ठोके भलत्याच प्रमाणांत पडूं लागत. भविष्याची—त्या प्रचीति आलेल्या कठोर सत्याची व दृश्याची आठवण होई व

डोकें अगदीं सुंद होऊन जाई !

उषेला डोहाळे लागले होते. अर्थात् असे बारीकसारीक विकार तिला व्हावयाचेच व ते होऊं लागले कीं दिवाकराला त्या दिवशीं जेवणसुद्धां जात नसे. भीतीनें—एका दारुण चिंतेनें त्याचें मन व्यास होई.

" काय, आतां कसें वाटतें आहे ? " उषेला जरा कणकण वाटत होती म्हणून ती निजली होती आणि दिवाकर तिच्या उशाशीं बसून तिच्या प्रकृतीची चौकशी करीत होता.

" आहे तसंच आहे " खालावलेल्या आवाजांत ती म्हणाली, " कसें होईल माझं कोण जाणे ! "

"कां बरं तूं असं बोलतेस, उषे ! अशा कांहींतरी वाईट कल्पना करूं नयेत. देव तुला सगळ्यांतून पार पाडील असा भरंवसा ठेव. " दिवाकरनें उपदेश केला. पण तो त्याचा त्यालाच पटेना.

" देवावर काय आहे ? प्रभेनें देवाचा कांहीं अपराध केला होता काय ? म्हणून तिला अशी शिक्षा मिळावी ? " त्याच्या विचारांच्या तंद्रीचा उषेच्या प्रश्नानें भंग केला.

" ऐकलं का...मी आतां लौकरच माहेरीं जाणार...बाळंतप म्हणजे पणच तो ! जगलें वाचलें तर परत येईनच... आणि... आणि कांहीं बरेंवाईट झालें तर... तर... "

" उषे ! उषे ! " तिच्या तोंडावर हात ठेवीत दिवाकर केंविलवाण्या आवाजांत म्हणाला, " काय बरं हें ! नको ग असं बोलूंस... मला कसंकसं होतं तूं असं कांहीं म्हटलंस म्हणजे—! सगळ्या

बायका सुखरूप येत नाहींत का बाळंतपणांतून ! शंभरांतून एखादें उदाहरण बाळंतीण बाई गेल्याचें दिसतें. तुझ्याच बाबतींत देव निष्ठुर होईल का ! ”

“ अन् नाहीं तरी कशावरून म्हणावं ? ” उषेनें हंसून उलट प्रश्न केला. दिवाकराला उत्तर सुचेना. “ कशावरून नाहीं ! नाहीं कशावरून ! आपल्या नशिबांत जर अनिष्ट भार्यायोग आहे तर नाहीं कशावरून ! ” दिवाकराच्या मनांत विचार घोळूं लागले. बिचारा दिवाकर ! कुठली झक् मारली न् सावळ्याला हात दाखवून अवलक्षण करून घेतलें असें त्याला होऊन गेलें होतें आतां !

सातव्या महिन्यांत उषा माहेरीं गेली. जातांना आपण आपल्या पत्नीला कायमचा निरोप देत आहोंत, असा वाईट विचार दिवाकरच्या मनांत आला म्हणून तो आपल्यावरच रागावला होता.

दोन महिन्यांनीं एका सुंदर पुत्राला जन्म देऊन उषेनें आपल्यालाही पितृपदाचा लाभ करून दिल्याचें त्याला कळलें. बायकोची प्रकृति बरी असेल कीं नाहीं या विचारानें त्याला कांहींच सुचेना. आपण केव्हां तिला पाहूं असें त्यास झालें. पण आई काय म्हणेल असेंही वाटलें. मनाच्या या चमत्कारिक स्थितींतच पोष्टमन् तार घेऊन आला. “ तार ! ” दिवाकराच्या छातींत धस्स झालें. आंत बहुतेक वाईटच बातमी असेल ! आपलें नशीबच फुटकें ! वगैरे विचार तेवढ्यांत त्याच्या डोक्यांत येऊन गेले. कंपित हृदयानें व थरथरणाऱ्या हातांनीं त्यानें तार उघडली. त्याचा अंदाज अगदीं बरोबर ठरला. उषा “ सीरियस् ” असल्याची तार होती ! त्याच्या हातून

तार गळून पडली. आजूबाजूचीं माणसें व कपडे हळूहळू फिरूं लागल्याचा त्याला भास झाला. तो दोन्ही हातांनीं डोकें गच्च दाबून खालीं बसला. लौकरच घरच्या मंडळींना सर्व कांहीं कळलें. दुपारच्याच गाडीनें माई व दिवाकर उषेच्या माहेरीं गेलीं. त्या वेळीं उषेला उन्मादवायु झालेला होता. तशा स्थितींतही दिवाकराला तिनें ओळखलें व ती किंचित् शांतपणानें म्हणाली–" मी यांतून जगत नाहीं–पण माझं बाळ बघितलंत का? आतां तुम्ही आणखी लग्न करा; पण बाळाचे हाल तेवढे करूं नका–! कसं ग माझं चिमणं–सोनुलं तें!"

बिचारा दिवाकर दगडासारख्या हृदयानें व अविचालित दृष्टीनें तिची जीवनज्योत मालवेपर्यंत उषेच्या उशाशीं तिची अर्थशून्य, केव्हां केव्हां अगदीं मार्मिक आणि प्रेमळपणाची बडबड ऐकत व पहात बसला होता. उषेनें आपल्या हातानें अरुणला दिवाकरच्या मांडीवर देऊन त्याचा सांभाळ नीट करण्याबद्दल विनवणी केली. हळूहळू तिला गुंगी आली अन् त्या गुंगींतच शांतपणानें तिनें सर्वांचा त्याग केला.

भारावलेल्या मस्तकानें व दुःखानें दडपलेल्या अंतःकरणानें दिवाकर व माई छोट्या अरुणाला घेऊन आपल्या घरीं आलीं.

सावळ्याचे ते कठोर शब्द दोनदां खरे झाले!

× × ×

वरील गोष्टीला दोन वर्षें झालीं. पुन्हां लोक दिवाकराला लग्नाचा आग्रह करताहेत. माईदेखील रोजच्या रोज अरुणाची व संसाराची दगदग झेंपत नसल्याचा पाढा वाचीत आहेत. दिवाकरचें वय अजून

फक्त तिशीच्या आंत आहे. संपत्ति रगड अन् मुलगा तिजवर उगीच म्हणायचा—वय प्रथम वराएवढेंच ! रोज दिवाकरला मुली सांगून येत आहेत व उत्तम उत्तम मुलींनाही आईस न जुमानतां दिवाकर बेलाशक नकार देत आहे. कारण मात्र सांगत नाहीं. वडिलांच्या रागाकडेही तो लक्ष देत नाहीं !

" त्यांच्यामुळेंच मला दोन जीवांचा नाश करावा लागला ! दोन नाजुक फुलें चिरडावीं लागलीं ! आतां किती वेळां नशिबाची परीक्षा पाहूं ? नको ! पुनः या जन्मांत मी लग्न करणार नाहीं ! त्याचा फार कटु अनुभव आला तवढाच पुरे ! बाळ ! अरुण ! तूंच आतां माझ्या जीवाचा विसावा... ! " मनाशीं असा आपला दृढनिश्चय बोलून दाखवतांना मांडीवरच्या अरुणाचें अत्यंत प्रेमभरानें तो चुंबन घेई !!

वाचकहो ! दिवाकरानें इतक्या तरुण वयांत अविवाहित राहण्याचा निश्चय—गृहसौख्याची इच्छा असूनही केलेला निश्चय—त्याचा अविचारीपणा दर्शवितो कीं ज्योतिषावरची अंधश्रद्धा दर्शवितो ? त्यानें पुन्हां लग्न करावें असें आपणांस वाटतें काय ?



# अलीकडच्या सुना



[ कालगतीबरोबर लोकांच्या आचारविचारांत फरक होणें हा जगाचा कायदाच आहे. पण हा कायदा लक्षांत न घेतल्यामुळें पुष्कळांना निष्कारण त्रास सोसावा लागतो. ]

( १ )

[ म्हाळसाकाकूंची वेणी घालायला रमाकाकू आल्या आहेत. दोघीही सुनांच्या गुणावगुणांबद्दल बोलत आहेत. ]

म्हाळसाकाकू—( वेणीचा घट्ट नमस्कार. कोपराइतक्या बाह्यांची चोळी. नथ, बुगडया, बाळया, भोकरवाळया, कुड्क वगैरे घातले आहेत. गळयांत सहा काळया पोतीचे घट्ट सर. हातांत सातसात काळया बांगडया, गोटपाटल्या, वाकी. ओचा गुडघ्याइतका. पायांत जोडवीं. कुंकू येथून तेथपर्यंत आडवी जंगी चिरी. केंस ओढल्यामुळें मानेला खूप ताण बसलेला स्पष्ट दिसत आहे. ) " काय करायचं ! अलीकडच्या सुना. आतां पहिल्या काळचे दिवस गेले बरं रखमाकाकू. आपली कांहीं प्राज्ञा होती का वर मान करायची ! आम्हीं असं केलं असतं म्हणजे आमच्या सासूबाईनीं आम्हांला फाडून खाल्लं असतं !"

रखमाकाकू—( वेणीच्या पेडांना पीळ भरीत ) " एवढं झालं तरी काय काकू ! "

म्हाळसाकाकू—" व्हायचंय् काय कपाळ! रोजची नवी तऱ्हा आहे एकेक–"

रखमाकाकू—" भारीच बाई अलीकडच्या सुना अघोचर झाल्या आहेत आतांशा! आमचीनं तर अलीकडे भांगांतलं पिंपळपान अन् डोकींतलीं फुलं घालायचंच सोडून दिलं आहे. किती बोलावं माण-सानं! तुम्ही करा वटवट न् आम्ही आपले निगरगट्ट म्हणतात ना तशापैकींच हें! पण तुमची केलंन् तरी काय हें नाहीं सांगितलंत!"

म्हाळसाकाकू—" तेंच तर सांगतें. काल तांदूळ निवडीत होती ही अन् एकनाथ–प्रत्यक्ष नवरा बरं का– तिकडनं आला तरी आपलं तांदूळ निवडण्यांतच ही आपली दंग! उठून उभं नको होतं का हिनं राहायला! तिथनं निघून जाण्याचं राहिलं बाजूला. पण कांहीं... कांहीं तरी मर्यादशीलपणा! आमचं एक असो म्हातारड्यांचं. पण प्रत्यक्ष नवऱ्याबद्दल तरी कांहीं आदर!"

रखमाकाकू—(वेणीचा नमस्कार घट्ट खोंवीत) " अलीकडच्या सुना बाई ह्या! त्यांच्यापुढं थोडंच आपलं कांहीं चालायचं आहे! बरं! झाली वेळ. येतें मी—"

म्हाळसाकाकू—" रमे! करंडा आण म्हणूनसुद्धां सांगायला हवं ना! अगदींच कशी तूं सांगकामी! ..." (रमाबाई कुंकू लावतात.)

× × ×

(२)

[ 'धाकटया सूनबाई' हें पुस्तक वाचण्यांत कमळाबाई दंग

झाल्या आहेत. हातांत सोन्याचे दोन दोन बिलवर अन् दोन दोन कांचेच्या बांगडया. गळ्यांत एकदाणी. कानांत ठसठशीत कुडया. सैलसर बटीचा अंबाडा. कानांत चमकी. अर्ध्या दंडाइतकी पांढरी कोपरी. शिसपेन्सिलीच्या आकाराएवढें कुंकू. ]

( माधवराव प्रवेश करतात. साधा शर्ट. बारीकसें गंध. हातांत चांदीचें घडयाळ. )

माधवरावः—" काय चाललंय् ? "

कमळाबाईः—( पुस्तक मिटून लाजून ) " केव्हां येणं झालं ? समजलं दिखील नाहीं मला !"

माधवराव—"पुस्तक वाचतांना कशाला आजूबाजूचं भान राहातं आहे ? पंचवीस मिनिटं झालीं येऊन मला. अन् हें काय ? प्रभाकर उठला वाटतं ! अरे...लबाडा...आईला वाचूं देखील देत नाहींस ना ? अले येले ! चल...चल ! पबाऽपबाऽ ! "

कमळाबाई—( प्रभाकराला उभा करून हळूहळू चालवत ) " कोण बाई बोलावतंय् बाळाला— चाल चाल माते ! पायीं मोले काते—हं, जा एकदां. कधीं गेला होतास का ? चल् चावट कुठचा !" ( माधवराव प्रभाचे मुके घेतात. )

[ आडून ऐकत असलेल्या रमाबाई पुढें येतात. धारवाडी खणाची लांब चोळी. घट्ट अंबाडा. पुष्कळ मोतीं बसवून ठसठशीत केलेलीं मोठीं कुडीं न् बुगडयांच्या कानांत चौफुले. कुंकू पावलीएवढें. गळ्यांत मणिमंगळसूत्र, जाळीचा मणी, जोंधळी पोत, आखूड काळ्या मण्यांत ओंवलेला एक सर. ओंचा टांचेपासून चार बोटें

वागलेली आहे अन् मी तिला आजपर्यंत दुःखाची झुळुकसुद्धां लागूं दिलेली नाहीं. माझ्यावर असा पोट भरायचा प्रसंग आलाय् खरा; पण त्याची जाणीव तिला होऊं नये एवढीच माझी इच्छा आहे. तेव्हां...तेव्हां . . .म्हणून म्हणतें—मीच जातें तिकडे—म्हणजे— म्हणजे बरें तें—"

पहिलीं पांचसात वाक्यें एका दमांत सोनुताई बोलल्या खऱ्या; पण शेवटच्या वाक्यांत मात्र कांहीं नाहीं तरी चारदां त्या अडखळल्या. अन् यःकश्चित् नोकरपेशाच्या दृष्टीनें आपलें भाषण किती अमर्यादपणाचें झालें असेंही त्यांना वाटलें. एवढा मान आणि अपमान यांना कशाला पाहिजे आहे! असें तर प्रोफेसरांना वाटलें नसेल ? त्यांनीं प्रोफेसरांकडे पाहिलें व ती त्यांची नजर त्यांना कशीशीच वाटली! यांनीं सांगितलें तरी कमाला आणूं नये असेंच सोनुताईंना वाटलें.

मनःक्षोभ ज्यांत स्पष्ट प्रतिबिंबित झाला होता अशा घोगरट आवाजांत प्रोफेसर म्हणाले, "जरूर बोलवा त्यांना. इंदिरेला सध्यां बरोबरीची मैत्रीण मिळाली तर हवीच आहे. कदाचित् आरामही वाटेल त्यामुळें तिला." एवढेंच बोलून ते झपाट्यानें मागें वळले.

× × ×

पांचसहा दिवसांतच कमुताई येऊन दाखल झाल्या. त्या आल्यामुळें इंदिराबाईच्या मनाला पुष्कळच उल्हास वाटूं लागला. कमुताई फारच प्रेमळ व बोलक्या होत्या. त्या इंदिराबाईची तऱ्हेतऱ्हेनें

गोष्टी सांगून, गाणीं म्हणून दाखवून करमणूक करीत. त्या बहुतेक प्रसंगीं प्रोफेसर तेथें हजर राहण्याची सुसंधि दवडीत नसत. सोनुताईपेक्षां कमुताई कितीतरी तेजस्वी आणि नाजूक आहेत—आणि इंदिरेपेक्षां—छट्! तुलनासुद्धां करतां येत नाहीं. जमीनअस्मानाचा फरक! प्रोफेसरसाहेबांच्या बहकलेल्या विचारांचें तारूं चुकीच्या दिशेनें धांवूं लागलें.

× × ×

प्रोफेसरसाहेबांचें डोकें दुखत होतें म्हणून आज ते किंचित् लवकर घरीं आले. आल्याबरोबर इंदिरेच्या खोलीकडे ते वळले, पण दरवाजापाशींच थबकले. एका अत्यंत हृदयंगम काव्यांतील ओळी कमुताई इंदिराबाईंना मुक्तकंठानें गाऊन दाखवीत होत्या. त्या स्वरलहरी ऐकतांना डोकें दुखत असल्याचेंही प्रोफेसर विसरून गेले. फटींतून त्यांनीं आंत पाहिलें. इंदिरा आणि सोनुताई तन्मयतेनें काव्य श्रवण करीत होत्या. कमुताई काव्याशीं अगदीं तादात्म्य पावल्या होत्या.

शब्दांमागून शब्द आणि ओळींमागून ओळी सुरेल व मधुर आवाजांत प्रोफेसरांच्या कानांवर पडत होत्या. कोणतें काव्य बरें? प्रोफेसरांच्या तल्लख डोक्यांत एकदम प्रकाश पडला! हां! ' हृदयेश ' हेंच तें काव्य! काव्य सुंदर, श्रोते सुंदर, गायिका सुंदर, गायन सुंदर, मूर्तिमान् सौन्दर्य त्या वेळीं त्या लहानशा खोलींत अवतीर्ण झालें होतें असेंच प्रोफेसरांना वाटलें. काव्य थांबलें. कमुताई म्हणाली, " आईऽऽऽ! या काव्याला उत्तरही इतकंच सुंदर आलं आहे बरं का? स्त्रीहृदयाला एकदांच प्रेम करतां येतं. पुरु—

षांची वृत्ति भ्रमराप्रमाणें मधुलोलुप असते. अशा मुख्य कल्पनेवर ' हृदयेश ' या काव्याची रचना कवयित्रीनें केली आहे बरं का, आई ! ”

जीवाचे कान करून प्रोफेसरसाहेब पुढें ऐकूं लागले.

“ याच्या पुढच्याच अंकांत ' मिलिन्द ' कवीची उत्तरादाखल ' हृदयेश्वरी ' कविता प्रसिद्ध झाली आहे. फारच सुंदर आहे बरं का ती. मला तर भारीच आवडली. खरंच तो कवि किती प्रेमळ असेल ! ” इतरांना उद्देशून कमुताईचा प्रश्न होता. “ कां फारसं कवीचं वर्णन चालवलं आहेस, कमे ! लग्न नाहीं झालेलं वाटतं अजून त्याचं ! कुठला ग तो ? केवढासा ग आहे ? ” सोनुताईनीं हंसत हंसत सवाल केले.

“ इश्श् ! हें ग काय आई तुझं आपलं कांहींच्याबाहीच काढायचं ? त्या मिलिन्दाचं नांवगांव देखील मला माहीत नाहीं. नुसतं काव्य चांगलं म्हटलं तर तूं कुठल्याकुठें बोलणं नेलंस ! ” गाल फुगवून रुसव्या आवाजांत लाडकेपणानें कमुताई म्हणाली. “ ऐक तरी. किती हृदयंगम काव्य झालंय् तें ? तेंही म्हणून दाखवतें. ”

खरी गोष्ट अशी होती कीं मिलिन्द हे प्रोफेसरांनींच टोपणनांव घेतलें होतें. तेव्हां त्रिभुवनांत आज मी धन्य धन्य आहें असें प्रोफेसरांना वाटलें. अनेक सुवर्णपदकें लटकावण्यापेक्षां आपल्या योग्यतेबद्दल ह्या रमणीचें हें एकच हृदयस्पर्शी वाक्य अधिक आल्हादकारक आहे असें त्यांना वाटूं लागलें.

पुन्हां एकदां कमुताई मधुर आवाजांत गाऊं लागली. ह्या

वेळच्या काव्यांत अत्यंत करुणरस भरलेला होता. 'श्रीरामप्रभूप्रमाणें एकनिष्ठ प्रेम पुरुषही करूं शकतात' हा त्यांत मुख्य वर्ण्य विषय होता.

"त्या कवीचा तपास केला पाहिजे. खराच तो अविवाहित असला तर बरंऽच झालं, कमे ! म्हणजे तुला आणखी स्थळं हुड-कायला नकोत !" डोळे मिचकावीत सोनुताई म्हणाल्या.

आतां मात्र कमुताई फारच रागावली. "हें ग काय आई तुझं सदान् कदा ! मी आपली जातेंच इथून !" प्रोफेसर मोठ्या जल-दीनें दिवाणखान्यांत चालते झाले.

प्रोफेसर हेच 'हृदयेश्वरी' या कवितेचे जनक असतील अशी कुणाला ओझरती शंकासुद्धां येण्यासारखी नव्हती. कारण त्यांना 'कवि' म्हणण्याजोगें एकही काव्य त्यांच्याकडून लिहिलें गेलें नव्हतें. कोणत्याही कवीवर, काव्यविषयावर किंवा काव्यासंबंधीं चर्चा त्यांनीं कुठेंही, कोणापाशींही केली नव्हती—कवितेच्या तंद्रींत इतरांना क्षुल्लक लेखलें नव्हतें–किंवा निसर्गाची शोभा पहात विचारमग्न स्थितींतही ते कधीं कुणाला आढळले नव्हते. मात्र केव्हां केव्हां त्यांना काव्य करण्याची लहर येई नि ते कविता रचून लिहूनही ठेवीत. परंतु त्या प्रकाशनासाठीं धाडण्याइतकी त्यांची लायकीच नाहीं असें प्रोफेसरांचें प्रामाणिक मत होतें. पण त्यांची ही कविता मात्र अत्यंत हृदयंगम उतरली होती असें 'जयंत' मासिकाच्या खुद्द संपा-दकांनींच त्यांना कळविलें होतें. जयंत मासिकांत 'हृदयेश' या नांवाची एक अत्यंत हृदयंगम कविता प्रसिद्ध झाली होती. त्या-

खालीं फक्त 'कमलिनी' एवढीच सही होती. त्याच कवितेला प्रत्यु-त्तरादाखल 'हृदयेश्वरी' हें काव्य प्रोफेसरांनीं रचलें होतें.

× × × ×

घरापाठीमागल्या बागेंत एका दगडावर बसून कमुताई तन्मय-तेनें कांहींतरी पुटपुटत होत्या. हळुहळु प्रोफेसरांच्या 'हृदयेश्वरी' काव्याच्या ओळी स्पष्ट ऐकूं येऊं लागल्या. कुणींतरी तिच्या त्या तन्मयतेचा भंग केला.

"कमुताईऽऽ!" तिनें वळून पाहिलें. प्रोफेसरांची मूर्ति तिचें अनिमिष नेत्रांनीं अवलोकन करीत होती. थोडा वेळ सर्व शांत होतें. पांचच मिनिटांनीं समोरच्याच एका मोठ्याशा दगडावर प्रोफेसर विराजमान झाले. पुन्हां थोडा वेळ शांतपणांत गेला.

आपण एकट्याच बागेंत आहोंत हें पाहून त्यांनीं परत जायला हवें होतें असें कमुताईच्या मनांत आलें. पण ते ज्याअर्थीं मुद्दाम येथेंच आले त्याअर्थीं आपणाशीं कांहींतरी बोलण्याचा त्यांचा उद्देश असावा हें तिनें ओळखलें. कांहींएक न बोलतां दोघांनींच इथें बसणें हें लोकाचार व शिष्टाचार यांना किती सोडून आहे हें ध्यानांत येऊन शेवटीं तिनेंच कांहींतरी बोलायला सुरवात केली. "मी आतां उद्यां परवां जाईन म्हणतें आहे. ताईची आतां हिंडण्या-फिरण्याइतकी प्रकृति सुधारली आहे; आणखी मला येऊन एक महिना होऊन गेला. तेव्हां...आतां जायला हरकत नाहीं." कमुताईच्या गोड चेहऱ्यावर मावळत्या सूर्याचा उज्वल प्रकाश पडून तो अधिकच मोहक दिसत होता. प्रोफेसर अविचल दृष्टीनें तिकडे पहात होते.

" एक महिना झाला म्हणतां ? " प्रोफेसरांनीं आश्चर्यानें म्हटलें. " किती दिवस लवकर गेले हे ! खरंच, तुम्ही आलांत त्यामुळेंच इंदिरा सुधारली. हे तुमचे उपकार माझ्या हातून न फिटण्याइतके अमोल आहेत. पण तुमच्या सहवासाचा लाभ आणखी कांहीं दिवस व्हावा अशी इंदिरेची फार इच्छा आहे. एवढ्या तिच्या विनवणीला मान देणार ना ? "

" त्यांची मी परवानगी घेतलीच आहे. दुसरें असें कीं—थोडक्यांत गोडी ! मी खूप दिवस राहून तुम्हांस कंटाळा आणण्यापेक्षां आतां जावं हेंच बरें ! " तिच्या डोळ्यांतील पाणीदारपणांत निश्चयी वृत्तीचीही झांक दिसत होती.

" मला अन् तुमचा कंटाळा ? अशक्य ! कमलिनी कधीं कुणास नकोशी वाटते कां ? मग तुमच्यासारख्या प्रेमळ, बहुश्रुत, विनोदी अन् सुंदर पाहुण्याचा कंटाळा आला म्हणजे अरसिक पशूंतच आमची गणना करावी लागेल !—" प्रोफेसर बोलतांना एकदम थबकले. कारण कमुताईच्या डोळ्यांत आतां रागीटपणा उमटलेला त्यांना दिसत होता असें प्रोफेसरांच्या मनांत आलें. पण सुटलेला बाण अन् बोललेला शब्द कधींच परत येत नसतात !

आतां हें संभाषण लांबणें इष्ट नाहीं असें वाटूनच कीं काय कमुताई उठून उभ्या राहिल्या. लुगडयाला लागलेली माती झटकीत त्या म्हणाल्या, " चला, इंदिराबाई वाट पाहात असतील. त्यांची झोंपमोड होऊं नये म्हणून मी इथं बागेंत बसलें होतें जरा. आतां त्या जाग्या झाल्या असतील नाहीं ? जाऊं या."

प्रोफेसरांच्या हृदयाची विलक्षण खळबळ चालली होती. आपल्या हृदयसिंहासनावरील इंदिरेची पुसट आकृति खोडून त्यांनीं तेथें दुसरी रम्य कल्पनामूर्ति रेखाटली होती. ती सोनुताईची आहे अशी त्यांची इतके दिवस भ्रामक कल्पना होती; पण कमुताई आल्यानंतर कमुताईला त्यांनीं तेथील रिकाम्या जागीं अधिष्ठित केलें. दिवसेंदिवस त्यांचा प्रेमरोग वाढत चालला. इंदिरेवर कधींकाळीं आपलें प्रेम होतें तें खरें नव्हे असें त्यांची मनोदेवता त्यांना सांगूं लागली. प्रेयसी-जवळ आज प्रेम निवेदन करण्याचा त्यांनीं पक्का निश्चय केला होता व त्याच हेतूनें ते बागेंत आले होते.

मनोविकारांच्या आवेगानें त्यांचें हृदय धडधडूं लागलें व आवाजांत कंप आला. " थांब...कमुताई...कमल...कमाऽऽ! थांब. दोनच मिनिटें उभी रहा." ते काकुळतीनें म्हणाले.

कमल अगदीं चकित झाली. प्रोफेसरांच्या दृष्टींत पावित्र्य नाहीं असें तिला कधींपासून तरी वाटत होतें; परंतु ती मजल येथवर येऊन आपल्यालाच त्यांच्या प्रेमाच्या झळा लागतील ही कल्पनाही तिला नव्हती. अगदीं एकेरी नांवांत त्यांनीं केलेली विनवणी ऐकून काय करावें हें न सुचल्यामुळें ती निश्चल उभी राहिली.

" कमल!" हृदयनिवेदनास त्यांनीं सुरवात केली. " तृषार्त मनुष्याला सुवासिक, थंड, निर्मळ पाण्याचा ठेवा मिळाला कीं त्याला जसा आनंद होतो तशीच माझी स्थिति झाली आहे. कमाऽ! माझें प्रेम तुझ्यावर जडलें आहे. कधीं एकदां सारें तुला सांगेन असें मला होऊन गेलें होतें. माझ्या प्रेमदेवते, तूं माझा अव्हेर करणार

नाहींस ना! तुझें त्या कवीवर प्रेम जडलेंय् का! तसें असेल तर मीच तो 'मिलिन्द' कवी! हें सांगायला मला अत्यंत अभिमान वाटतो. देवी, या निस्सीम भक्ताचा हा प्रेमनैवेद्य ग्रहण कर—"

भाषणाच्या आरंभीं आरंभीं कमुताई गांगरून गेली. कवि तेच प्रोफेसर हें ऐकून मध्येंच एकदां ती चकित झाली. आणि शेवटीं शेवटीं तो प्रेमप्रदर्शनाचा नाटकी प्रकार तिला हास्यास्पद वाटूं लागला. शांतवृत्तीनें ती पुन्हां दगडावर बसली आणि म्हणाली, "पण एक लग्नाची बायको असतांना तुमचें मजवर प्रेम जडेल हें संभवनीयच नाहीं. त्यांतून एकपत्नीव्रताचे तुम्ही कट्टे पुरस्कर्ते आहांत, हें त्या 'हृदयेश्वरी' काव्यानें तुम्हीं सिद्ध केलेंच आहे. पुरुषांची 'हृदयेश्वरी' एकच असूं शकते हें तुमचें प्रांजल मत काव्यांतून प्रसिद्ध झालेंच आहे. अर्थात् इंदिराबाईशिवाय दुसऱ्या कुणावरही प्रेम करण्यास तुम्हांला आतां हक्क राहिलेला नाहीं हें उघडच आहे. लग्न केल्यापासून जर इंदिराबाई तुमच्या 'हृदयेश्वरी' होत्या तर आमरण त्याच राहिल्या पाहिजेत. कारण पुरुष हा एक-दांच प्रेम करूं शकतो असें तुम्ही म्हणतां. देवी नैवेद्य ग्रहण करते. पण तो उष्टा असेल तर ग्रहण करीत नाहीं. तुमचा प्रेमनैवेद्य आधीं इंदिराबाईनीं ग्रहण केलेला आहे. अर्थात् उच्छिष्ट म्हणून मला त्याचा स्वीकार करतां येत नाहीं." पुस्तकी प्रश्नाला पुस्तकी उत्तर देऊन कमुताई स्तब्ध राहिली; पण तिला स्वस्थ बसवेना. थोड्या वेळानें उपरोधिक स्वरांत ती पुन्हां म्हणाली—"इंदिराबाई इतक्या आजारी असतांना तुमच्या मनांत अशा विषारी भावना उद्भवतात यावरू-

नच तुमच्या मनाच्या थोरवीचा अंदाज होतो ! ”

“ थांब ! कमल, मला तूं अगदीं निंद्य ठरवूं नकोस ! ” घाई-घाईनें प्रोफेसरांनीं तिला थांबवून उत्तर केलें. “ इंदिरेवर माझें प्रेम कधींच नव्हतें. फक्त पत्नीविषयक कर्तव्यें मी निमुटपणें पार पाडीत होतों एवढेंच. कमल—कमूऽ ! माझी प्रेमदेवता फक्त तूंच—आणि जन्मभर तूंच राहशील !! माझा धिक्कार करण्याइतका मी अधम नाहीं. कमलिनीभोंवतीं सुवासाच्या मोहानें गुंजारव करणें हा मिलिन्दाचा अपराध नव्हे—”

“अपराधच आहे !” संतप्त आवाजांत कमुताई म्हणाली, “दिसेल त्या कमलिनीभोंवती घोटाळणें हा तरी मधुकराचा लोंचटपणाच नव्हे का ? तुम्ही तरी काय तसच ? इंदिराबाईशीं तीन वर्षें संसार करून एका अल्पपरिचित बाईजवळ—माझ्याजवळ—खुशाल त्यांच्याबद्दल प्रेम नाहीं हें सांगतांना थोडी तरी जीभ चावायला हवी होती. तसें कशाला ? इतके दिवस नाहीं कुठें तुमची दृष्टि आजूबाजूला वळली ती ? इंदिराबाई आजारी पडून मरणोन्मुख झाल्या, तेव्हां तुमची जहरी नजर आणि प्रेम आजूबाजूला योग्य स्थळ शोधूं लागलें ना ? तुम्हांला थोडंतरी कांहीं वाटायला हवं होतं—माझ्या आईबद्दलसुद्धां तुमच्या मनांत शुद्धपणा नाहीं हेंही माझ्या लक्षांत आलें आहे. बायकांची नजर या बाबतींत फार सूक्ष्म असते ! पण पुरे आतां. हा विषय आणखी वाढविण्याची माझी इच्छा नाहीं. ‘ हृदयेश ’ ही माझीच कविता होती. आणि अगदीं त्याप्रमाणेंच मला दुष्ट अनुभवही आला. असो, आजच रात्रीच्या गाडीनें मी न् आई निघून

जाणार. तुमच्या मनांत पापी विचार नांदत असतांना आम्ही येथें राहणें सुरक्षित नाहीं—"

"कमल, नको ग असें करूं! हें इंदिरेजवळ बोलूं तरी नकोस!" पुन्हां प्रोफेसरांनीं वेड्याप्रमाणें याचना केली.

"—मीं ऐकलंय बरं सारं! देवा, कशाला हें ऐकायला जिवंत ठेवलंस मला?—" अगदीं हृदय पिळवटून बाहेर पडणारे हे शब्द ज्या दिशेनें आले तिकडे दोघांनींही पाहिलें व तीं चकित झालीं. इंदिराबाईची अशक्त देहलता संतापाच्या वावटळीनें थरथर कांपत होती! त्यांनीं जवळच्याच मोठ्या आंब्याच्या झाडाचा आधार घेतला होता. पाठीमागें सोनुताई त्यांना सांवरून उभ्या होत्या.

"अग, हें काय?" घाईघाईनें प्रोफेसर पत्नीजवळ येऊन म्हणाले, "इतक्यांत कशाला बरं तूं इतके श्रम घेतलेस? खालीं तरी बस. उभे राहण्याइतकी तुझी प्रकृति अजून सुधारली नाहीं. चल आंत—"

"कशाला माझी एवढी कळकळ उगीच दाखवतां? माझी प्रकृति जास्त झाली काऽय अन् मी मेलें काय? कमुताई नाहीं म्हणाली म्हणून काय झालें? इतर पुष्कळ सुंदर मुली जगांत आहेत—त्यांतून एखादी 'हृदयेश्वरी' तुम्हांला मोठ्या आनंदानं माळ घालील. मीं आतां जगणें म्हणजे तुमच्या प्रेममय जीवनांत अडथळा आणणंच आहे. पण काय करूं? अजून मरण येत नाहीं! मीच दुर्दैवी!!" मनांतल्या संतापाचा अतिरेक होऊन हे शब्द इंदिराबाईनीं कष्टानें व अडखळत उच्चारले. मेंदूला हे मानसिक श्रम सहज न होऊन

त्या ग्लानि येऊन बेशुद्ध झाल्या. पडतां पडतां सोनुताईनीं त्यांना सांवरलें.

डॉक्टरनीं सांगितल्याप्रमाणें हा दुःखाचा आघात सहन न होऊन त्यांचा ताप एकदम चढला व दुखणें विकोपाला गेलें. आणि प्रोफेसरसाहेबांना प्रेमहीन विवाहशृंखलेंतून मुक्त करण्यासाठीं इंदिराबाईनीं त्यांचा कायमचा निरोप घेतला !

दुसरे दिवशीं सकाळीं कमुताई व सोनुताईही निघून गेल्या !



# वधूपरीक्षा



ऐन दोनप्रहरची वेळ! सकाळच्या वेळीं सौख्यद वाटणारा भगवान् सूर्यनारायण आपलें जाज्वल्य स्वरूप शक्य तेवढ्या प्रखरतेनें दर्शवीत होता. एरवीं माणसांच्या रहदारीनें गजबजून गेलेले रस्ते या वेळीं मोकळे दिसत होते. अशा वेळीं हिरापूरच्या बाजारपेठेंतून एक मनुष्य मोठ्या जलदीनें जात होता. त्याचे कपडे जीर्ण व मळकट दिसत होते. वर्ण काळसर असून चेहऱ्यावरून घर्मबिन्दु ठिपकत होते. दाढीमिशा खूप वाढल्या होत्या. एकंदरींत तो इतका हीन दीन दिसत होता कीं, त्याकडे बघून कुणाचाही विशेष बरासा ग्रह झाला नसता. तो मनुष्य इनामदारांच्या वाड्यापाशीं आला व एखाद्या माहितगाराप्रमाणें थेट आंत शिरला.

या वेळीं माईसाहेब (इनामदारांची पत्नी) आणि त्यांची कन्या चन्दू या वाड्याच्या सोप्यांत झोंपाळ्यावर बसल्या होत्या. वरील मनुष्य त्यांच्यासमोर जाऊन उभा राहिला. माईसाहेबांनीं त्याचें नखशिखान्त अवलोकन केलें; परंतु त्याच्या एकंदर वेषावरून त्याकडे विशेष लक्ष देऊन चौकशी करण्याचें कांहीं कारण नाहीं असें त्यांनीं ठरवलें. आपल्याला येऊन बराच वेळ झाला तरी आपली चौकशी कुणी करीत नाहीं हें त्यास चमत्कारिक वाटलें. शेवटीं त्यानेंच विचा-

रलें— " माईसाहेब ! मला ओळखलें नाहीं वाटतें ? "

" नाहीं ! ! कोण तूं ? " बेपर्वाईच्या आवाजांत माईसाहेब म्हणाल्या.

" मी—मी बाळू ! दहा वर्षांपूर्वी आपणांकडे विद्यार्थी म्हणून होतों. "

" दहा वर्षांनीं म्हणजे बरीच लौकर आपल्या अन्नदात्यांची चौकशी केलीस म्हणायची ! " माईसाहेब उपरोधिक स्वरांत ' अन्न-दात्यांची ' या शब्दावर जास्त जोर देत म्हणाल्या.

" तसें नव्हे–मी येथून निघालों तों मुंबईस गेलों. तेथें एका गृहस्थाचा प्रायव्हेट सेक्रेटरी म्हणून त्याजबरोबर आफ्रिकेंत गेलों होतों. तो हा दहा वर्षांनीं आतांच परत आलों. आल्याबरोबर तुम्हांला भेटायला आलों. "

हें सर्व भाषण माईसाहेबांनीं शांत चित्तानें ऐकलें; परंतु त्यांत विशेष लक्ष देण्यासारखें कांहींच त्यांना वाटलें नाहीं. म्हणून त्या स्वस्थ बसल्या एवढेंच नव्हे तर जवळचें एक पुस्तक काढून त्यांनीं वाचावयास सुरवात केली. बिचारा बाळू ! त्याला हा अपमान सहन झाला नाहीं ! पण काय करतो बिचारा ! त्यांच्या त्या वागणुकीकडे मुद्दाम दुर्लक्ष करून तो म्हणाला—

" जेवणें वगैरे झालीं वाटतें ? माझें अजून जेवण व्हावयाचें आहे. "

" मग जरा लवकर तरी यायचं होतंस ! बऽरं ! " तुच्छतेनें माईसाहेब म्हणाल्या. नंतर कन्येकडे वळून त्या म्हणाल्या, " चंदू-

ताई ! जा बरं आचाऱ्याला सांग यांना वाढायला. जा, तेवढं सांगून ये, ताई. ”

चंदूताईला मनापासून संताप आला. एक यःकश्चित् क्षुद्र मनुष्य नि त्यासाठीं आपण तसदी घ्यायची? काय हें! त्या म्हणाल्या, “ हें ग काय माई! मला अगदीं कंटाळा आला आहे गडे उठायचा ! ”

आतां मात्र बाळू अगदीं चकित झाला. ऐन दोनप्रहरीं आलेल्या मनुष्याच्या जेवणाची आपणहून चौकशी करायची तर बाजूलाच राहिली, पण त्यानें ‘ माझें जेवण व्हायचें आहे ’ असें म्हटलें तरी नुसती आचाऱ्याला वर्दी द्यायचेंसुद्धां या श्रीमान् परंतु ऐदी माणसांच्या जिवावर येतें ! धन्य ! काय हा मनाचा मोठेपणा आणि मानसिक सौजन्य ! हेच जर आपण अप्-टु-डेट पोषाखांत असतों तर याच माईसाहेबांनीं आपला आदरसत्कार केला असता. गरीब मनुष्याला इथें जेवणसुद्धां मिळणें अशक्यच ! क्षणार्धांत बाळूच्या डोक्यांत हे विचार येऊन गेले. आतां इथें जेवणें म्हणजे अत्यन्त लाजिरवाणें आहे असें वाटून बाळू म्हणाला—

“ नको माईसाहेब ! मला कांहीं एवढी भूक नाहीं आणि जरी असली तरी मी दुसरीकडे कोठेंतरी जेवीन. उगीच त्यांना तसदी नको ! बरें, येतों आतां. फार तसदी पडली त्याची माफी असावी !” एवढें बोलून बाळू एकदम तेथून चालता झाला. तेव्हां मात्र माईसाहेबांना जरा चमत्कारिक वाटलें ! त्या म्हणाल्या—

“ चंदू, हें कांहीं बरं झालं नाहीं—”

" काय ग त्यांत झालं माई? आणि त्याला तरी केवढा ताठा! जेवायचं म्हणाला नि तस्सा चालता झाला! इथें तरी कुणाचं अडलंय् खेटर त्याच्यावांचून?" चंदूताई लाडिकपणानें म्हणाल्या. आणि हें सर्व भाषण दाराशींच असलेल्या बाळूच्या कानावर इत्थंभूत पडलें!!

* * *

" किती हुंडा घेऊं म्हणताहेत ते?"

" त्यांची हुंड्याची कांहींच अट नाहीं. मुलगी पसंत पडेल तर एक पैसुद्धां हुंडा नको म्हणताहेत. त्यांना काय कमी आहे म्हणा! बोलूनचालून माणिकपूरचे जहागिरदार ते! त्यांना जर चंदू पसंत पडेल तर आमचं नशीबच उघडलं म्हणायचं—"

वरील संवाद बापूसाहेब इनामदार व त्यांच्या पत्नी माईसाहेब यांच्यामध्यें चालला होता. विषय त्यांच्या उपवर कन्येच्या–चंदूच्या –विवाहासंबंधींच होता. तेव्हां चंदू तिथें हजर नव्हतीच.

बापूसाहेब म्हणाले, " हें पहा, उद्यां दुपारीं ते मित्रमंडळी घेऊन चंदूला बघायला येतील. तेव्हां व्यवस्था अगदीं अप्-टु-डेट पाहिजे बरं का? आणि चंदूलाही म्हणावं कीं नेहमींच्या उद्धटपणाचं न् लाडकेपणाचं प्रदर्शन नको करूंस त्यांच्या समोर. तिला जरा व्यवस्थित वागायला सांग—"

" इश्श्! ती केव्हां करते उद्धटपणा?" माईसाहेब मुलीची बाजू सावरून घेत म्हणाल्या.

" करते नाहींतर काय! बरं, तें जाऊं दे! उद्यांची व्यवस्था

झक्क ठेवा म्हणजे झालं ! " बापूसाहेब हंसून म्हणाले.

* * *

दुसरे दिवशीं दुपारीं एक काळीभोर मोटार इनामदारांच्या वाड्याशीं उभी राहिली. त्यांतून दोन गृहस्थ आणि दोन पट्टेवाले उतरले. एका गृहस्थाचें वय अजमासें सव्वीस वर्षांचें होतें. त्यांचा पोशाख युरोपियन पद्धतीचा होता. मनगटावर सोन्याचें घड्याळ व डोळ्यांस सोनेरी फ्रेमचा चष्मा होता. हे सुंदर तरुण म्हणजेच माणिकपूरचे नवीन जहागिरदार बाळासाहेब ! दुसरे— त्यांचे मित्र. तेही फॅशनेबल व समवयस्क होते. मोटार उभी रहातांच बापूसाहेबांनीं सस्मित वदनानें त्यांचें स्वागत करून त्यांस एका अप्रतिम रीतीनें सजवलेल्या सुसज्जित दिवाणखान्यांत नेऊन खुर्च्यांवर बसविलें. थोडक्याच वेळांत गुलाबी जरीकांठी पातळ नेसलेली व अस्मानी ब्लाऊज घातलेली चंदू लाजत लाजत हातांत चहाचा ट्रे घेऊन आली व तो तेथें ठेऊन खालीं मान घालून पदराशीं खेळूं लागली.

बाळासाहेब कसल्या तरी गहन विचारांत गढून गेल्यासारखे दिसले. त्यांचें चंदूकडे लक्षही नव्हतें ! शेवटीं मित्र म्हणाले, " बसा. " ' भाऊ किती, बहिणी किती ? ' वगैरे ठराविक निरर्थक प्रश्न मित्रांनींच विचारले. तरी बाळासाहेब आपल्या विचारांतच गुंग होते ! शेवटीं मित्र म्हणाले, " बाळासाहेब, आपण विचारा कीं कांहीं आतां ! विचार कसला बरें करतां या वेळीं ? "

या प्रश्नानें तंद्रींतून एकदम जागे झाल्याप्रमाणें बाळासाहेब भानावर आले. ते एकदम चंदूला म्हणाले, " समजा, ऐन दोनप्रहरीं

उंच. भांग बराच फाटलेला. हातांत गोठपाटल्या, बिलवर, अन् कांचेच्या काळ्या बांगड्या. पायांत जोडवीं. ]

रमाबाई—" अरे हें काय माधव ? वडिलधाऱ्यांच्या देखत मुलाचे मुके घेऊं नयेत. अमर्यादा होते. बाकी तुला काय म्हणा ! कलियुग हें—काय काय होईल न् काय काय नाहीं ! तुझं एक असो. पण हिला तरी कांहीं वाटावं सासूचं ! नांव नाहीं अगदीं. खुश्शाल सासू आली तरी फतकल घालून बसायचं, बुकं वाचायचीं, माहेरीं पत्रं लिहायचीं, नवऱ्याशीं गुलगुल बोलायचं काय घटका न् घटका ! अलीकडे कांहींच राहिलं नाहीं. सासू काय ? आहे आपली कुणी तरी घरांत ! तिचा काय मान ठेवायचा आहे ? "

माधव—" अग आई, उगीच रागावूं नकोस. जगांत जर सगळीकडे पहाशील तर याहून अनर्थ दिसतील तुला ! नवराबायकोंनीं हातांत हात घालून फिरायला जायचं—पायांत बूट घालून स्वयंपाकघरांतसुद्धां जायचं ! जेवतांना सोंवळं मुळींच नाहीं—जानवं नाहीं. धोतरसुद्धां नेसणं म्हणजे जुनी रीत आहे आतां—बूट—पँट—हॅट ! बायकांच्या अंबाड्यांच्या तऱ्हातऱ्हा जर तूं पाहिल्यास तर म्हणशील कीं आपली सून किती साधी आहे म्हणून ! अन् खरंच ती कितीतरी साधेपणानें वागते—तरी तूं आपली रागावतेसच"—

रमाबाई—" हो ! हो ! तूं असलं बोलून आमचं तोंड गप्प करायचं अन् हिनं हळुहळु हंसायचं हें आतां रोजचंच झालं आहे ! कायरे, एवढं तुम्ही जुन्या तऱ्हेनं वागताहांत ? खुशाल माझ्यादेखत बोलत बसतां—हंसतां—मुलाचं कौतुक करतां ! झालं—तूं स्नान-

संध्या, देवपूजा सारंसारं सोडूनच दिलं आहेस. ही तर मुहूर्तमणी, जोडवीं, गोठपाटल्या हे रोजचे दागिनेसुद्धां घालीत नाहीं. गुलाबाचं फूल वाईट का दिसतं ? पण अलीकडच्या सुना न् आजकालचीं पोरं तुम्ही—तुम्हांला बोलणारं माणूस वेडं ठरायचं ! ”

कमळाबाई— “ पण एवढं रागावण्यासारखं केलं काय मीं ? अलीकडे कुणीच घालीत नाहीं जोडवीं न् बिडवीं. असा थोडासा फरक दोन पिढ्यांतून असायचाच ! ”

रमाबाई—“ तुम्ही अलीकडच्या शिकलेल्या सुना ! तुम्हींच आम्हांला शिकवायला पाहिजे सारं. आम्ही एकमेकांकडे पाहिलेलंसुद्धां आमच्या सासुबाईंना खपत नव्हतं ! मग असं बोलणं कुठलं ? दोन-दोन मुलं होईपर्यंत आमचं भाषण दिखिल नव्हतं ! पण आतां काळच फिरला—आतां आईदेखत मुलगे बायकोचा कैवार घेतात. सुना वरचढपणानें सासूला शिकवितात. ”

माधव—( हंसून ) “ आई, पण इतके दिवस बोलल्यावाचून बाबांना कसं चैन पडलं ग ? अन् आवडलं तरी बरं तें ? ”

रमाबाई—“तुमच्यापुढं कांहीं बोलायची सोय आहे का ? चल्, बोलूं नकोस—एकंदरींत पाहिलं लक्षण ! अलीकडच्या सुनांना बोललं कीं मुलगे रागावतात. आमचं तरी काय नडलं आहे म्हातारड्यांचं—हं, आण इकडे त्याला. छोट्या—छोटू, ये चल. चऽऽल. आपण आतां किनी भुर्र जाऊंऽअं बाप्पाला.” ( जातात. )

( ३ )

[ प्रभाकर वगैरे सर्व मंडळी चहाला जमली आहेत. कमळाबाई

कपबशांची आदळआपट करताहेत. पद्मावती चहा गाळीत आहे. माधवराव जवळच बसले आहेत ].

प्रभाकर—" पण आई, उगीच कां रागावतेस ! जगावेगळं का कांहीं वागतों आहें मी ! अग सगळीकडेच सुधारणा आहे. मग आपल्या घरीं देखील व्हायचीच. "

[ पद्मावती—आंखूड बाह्यांचें व सैल कॉलरचें फॅन्सी पोलकें. गळ्यांत गांठवलेलें मंगलसूत्र. कानांत हिऱ्यांचीं कुडीं. अर्धे कान झांकून गेलेली फुग्यांची केशरचना. तिरपा भांग. पायघोळ तपकिरी पातळ. पुष्कळसे आकडेकाटे लावून घातलेलें वेणीचक्कर. गळ्यांत सोन्याची खूप लांब चेन. हातांत गिनीगोल्डचे बारीक नाजूक दोन दोन बिलवर अन् मध्यें सेल्युलॉईडची एकेक काळी बारीक बांगडी. ]

पद्मावती—" उगीच वाढवण्यांत काय अर्थ आहे ! जिथें जगाचीच कल्पना नाहीं तिथें तुम्ही तरी सांगून काय उपयोग ! "

कमळाबाई—" हो ! मी उगीचच रागावतें बरंऽ ! तुम्ही इंग्रजी शिकलांत—मॅट्रिक झालांत—आकाशाला हात लागले आतां ! नवराही हवातसा नखाबोटावर खेळतो आहे. खुश्शाल ' तुम्ही आम्ही ' नवऱ्याला म्हणत जावं. नवऱ्यासमोर खुर्चीवर लोळत पडून वाचीत बसावं. नवऱ्याचे मित्रांबरोबर गप्पा मारीत बसावं. सारं रीतीचंच करणं हें. सासूसासरा घरांत आहेत आपलीं ! कोण्या झाडाचा पाला ! कांहींतरी मर्यादा बाळगायला हवी. तुम्हांला बोलाचालायला कांहीं आमच्यासारखी बंदी नाहीं ना ! पण एकेक फारच करायला

लागतां! मग माणसांनीं बोलूं नये तर काय करावं! आमच्या सासूबाईंना नुसतं बोललेलंसुद्धां आवडत नव्हतं!"

माधवराव—(शांतपणानें) "उगीच कां रागावतेस! दोघं नाटकाला जाऊन ही पुरुषांत बसली म्हणून तूं रागावतेस. पण ती नवऱ्याजवळ बसली ना! मला तर त्यांत कांहीं गैर दिसत नाहीं. प्रभा नवीन चालीचा आहे. त्याला अनुरूप बायको मिळाली आहे. त्यांचं कौतुक करीत आनंदानं काळ घालवावा का अशी धुसफूस करावी? पद्मा पेटी किती छान वाजवते. तसबिरीवर भरतकाम किती सुबक करते. पण तूं गुणांचं कौतुक मात्र करीत नाहींस अन् रागवायचं तेवढं सदान् कदा!"

प्रभाकर—"पहा, आई, बाबांचीं मतं कशीं उदार आहेत तीं! अग, पद्मा तुझी सून म्हणजे मुलीसारखीच ना? कां कुणी परकी आहे! तिच्या दोषांकडे कानाडोळा करून गुणांचा गौरव केला पाहिजेस तूं! त्याशिवाय सुनांना तरी सास्वांबद्दल आपलेपणा कसा वाटेल? मी नाटकाला गेलों—पद्मा न् मी खुर्चीवर शेजारीं बसून नाटक पाह्यलं—सारं कबूल—पण तूं आली असतीस तरी देखील मीं तुझं खुर्चीचंच तिकिट काढलं असतं. तुझी तरी मतं आजीच्या मतांशीं जुळत होतीं का? अग, नव्याजुन्यांचा मिलाफ करणं त्रासाचंच असतं. पण तुझ्यासारख्या समजदार सासूलाही तो करतां येत नाहीं हें आश्चर्य नव्हे का!"

पद्मावती—"पुरे हं आतां. त्या इतकं कांहीं नेहमीं बोलत नाहींत मला! तुम्ही उगीच त्यांनाच दोष देऊं नका!"

कमळाबाई—" अलीकडच्या सुनांना बोलायची कांहीं सोय आहे कां बाई ! "

( ४ )

[ माणिक दिलरुबा वाजवून गाणें म्हणत आहे. खुर्च्यांवरून प्रभाकरपंत आणि पद्मावती ऐकत बसलीं आहेत. प्रफुल्लकुमार रॉकिंग चेअरवर झोंके घेत चैनींत गाणें ऐकत आहेत. ]

[ माणिक—कान जवळजवळ सबंध झांकून गेले आहेत. कानांत बारीक एकेक माणिक असलेली कुर्डी. गळ्यांत फक्त गांठवलेलें मंगळसूत्र—हातांत एकेक तास मारलेला बारीक गिनी-गोल्डचा विलवर. ग्रेन व फिक्रट अस्मानी मलमली पातळ. अगदीं आंखूड व सैल बाह्यांचें, ओपन कॉलरचें, पांढरें रेशमी झम्पर. गोल्डन फ्रेमचा चष्मा. बोटांत एक बारीक खड्याची आंगठी. पाठीवर वेणी मोकळी सोडली असून शेवटास रिबनचें फूल बांधलें आहे. तोंडाला पॉवडर लावली आहे. ]

माणिक—( गाणें संपवून हातरुमालानें घाम पुशीत ) " आतां ठेवतें दिलरुबा अं. ठेवूं ना कुमार ! "

प्रफुल्ल—"ठेवून दे आतां.हं माई,मग सांगना? होय म्हण कीं—"

पद्मावती– " अरे कुमार, मी काय सांगणार त्यांत ! अन् तुझ्या मनांत असलं तर तूं माझं थोडंच ऐकणार आहेस नको म्हणून ! पण आपलं मनाला प्रशस्त वाटत नाहीं एवढं खरं."

प्रभाकरपंत—( टाईम्स दूर करून ) " कशाबद्दल चाललं आहे हितगुज ! "

माणिक—"हें पहा किनई, ललिता टॉकीजमध्यें कुमार नायकाचं काम करतात ना? आतां ते नायकाचं काम करतील तेव्हां मींही नायिकेचं काम करावं असं कुमारांचं मत आहे. त्याबद्दल ते बाईंना विचारीत आहेत."

प्रभाकरपंत—"होय रे कुमार? मग काय हरकत आहे? आमची माणिक दिसतेही सुंदर—गातेही सुंदर—मग ॲक्टिंगही सुंदर केलं कीं झालं! तूं कां नको म्हणतेस पद्मावती?"

पद्मावती—"हें काय हें? मुलाबाळांदेखत नांवानं हांक मारली कीं कसंसंच होतं बाई!"

प्रफुल्ल—"नॉन्सेन्स! मनावर बिंबलेले पूर्वसंस्कार नष्ट होणं शक्य नाहीं!"

पद्मावती—"हें रे काय कुमार? सुधारक असलं म्हणजे हवं तें केलं तरी चालतं वाटतं? मला नाही तुमचं सारं आवडत! माणिक तुला 'कुमार' म्हणते–मला नाहीं आवडत तें? थोरांची अमर्यादा नाहीं का होत त्यांत? हे इंग्लिश प्रचार मराठी मनाला रुचत नाहींत. पण ह्या अलीकडच्या सुना! कुणी बोलायचं त्यांना? अन् आतां तूं म्हणतो आहेस तिनं टॉकीजमध्यें काम करायचं म्हणून? असं बायकोचं प्रदर्शन करणं तुला बरं वाटतंय् ना?"

प्रफुल्ल—"पण माई, प्रदर्शन कसलं? अन् वाईट तरी काय त्यांत? सौंदर्य, मधुर गायन वगैरे तिच्या अंगच्या सद्गुणांचं चीज होईल.—अन् शिवाय नायक मीच आहें, मग काय झालं? हल्लीं चांगल्या घराण्यांतल्या बायकासुद्धां काम करितात सिनेमांतून! त्यांत

काय तुला एवढं गर्हणीय वाटतं कुणास ठाऊक ! अन् तिचीदेखील तयारी आहे. आहे ना माणिक ?"

पद्मावती—"तुम्हांला साऱ्यांना हवंय् तर मी कशाला नाहीं म्हणूं बाबा ! तिची स्वतःची इच्छा आहे ना ? मग नाहीं म्हणून चालेल कसं ? अलीकडच्या सुना त्या ! त्यांच्या म्हणण्याला नाहीं—होय म्हणण्याची सोय आहे का ? आम्ही दोघं नाटकाला गेलों होतों तेवढ्याबद्दलसुद्धां सासूबाई किती रागावल्या होत्या ! !"

प्रभाकरपंत—"तें जाऊं दे ग ! काळ पालटला कीं असे फरक पडायचेच ! ! तूंही 'अलीकडची सून' होतीस ना एकदां ! झालं तर !"

प्रफुल्ल—"माणिक, माईची समजूत पटल्याबद्दल एक गाणं म्हण आतां !"

( दिलरुबा काढून माणिक पुनः गाऊं लागते. )



# हृदयेश्वरी



लोटलेलें दार हळूच ढकलून प्रोफेसरांनीं आंत डोकावून पाहिलें, आणि पावलांचा आवाज होणार नाहीं अशा खबरदारीनें त्यांनीं आंत प्रवेश केला.

कोंपऱ्यांतील लोखंडी पलंगावर इंदिराबाई झोंपल्या होत्या. अंगावर पांघरूण होतें व एक हात त्या पांघरुणाबाहेर पडला होता. चेहऱ्यावर कितीतरी दिवसांपासून आजाराची फिकट छाया दिसत होती. त्या बाहेर पडलेल्या हातांतले दोन सोन्याचे बिलवर कितीतरी सैल झाले होते.

प्रोफेसरांनीं नुकतीच बागेंतून तोडून आणलेलीं गुलाबाचीं ताजीं फुलें टेबलावरच्या फ्लॉवरपॉटमध्यें ठेविलीं. खिडकीचा मलमलचा पडदा हळूच बाजूस सारून ते खिडकींतून बाहेरील दृश्य पाहात राहिले. खिडकींतून मागल्या बागेचा हृदयंगम देखावा दिसत होता. मागें विहिरीवर सोनुताई कपडे धुवीत होत्या. तिकडे प्रोफेसरांचें लक्ष गेलें. तें दृश्य त्यांना आकर्षक वाटलें व ते तिकडे अनिमिष नेत्रांनीं पहात राहिले. घाव घालतांना, सुबकतांना, खळबळतांना, पिळतांना सोनुताईचे कितीतरी तऱ्हांचे अंगविक्षेप होत होते. सोनुताईचें वय अदमासें ३०–३२ वर्षांचें होतें. त्यांचें शरीर गौरवर्ण आणि

गोंडस होतें. धुणीं पिळून ते सर्व पिळे त्यांनीं बादलींत घातले व दुसऱ्या हातानें ओचे उचलून आंवरून धरीत त्या तेथून निघून गेल्या.

प्रोफेसरांनीं एक दीर्घ निःश्वास टाकला व पुन्हां मागें वळून ते खुर्चीवर बसले. इंदिराबाई जाग्या होऊन उठून बसल्या होत्या.

" अगदींच गाढ झोंप लागली होती. कळलंसुद्धां नाहीं बाई केव्हां यायचं झालं तें— " असें म्हणून त्या किंचित् हंसल्या. एका काळीं सौंदर्यपूर्ण असणारे त्यांचे मोठाले डोळे आतां किनीतरी निस्तेज झाले होते आणि त्यांजभोंवतीं अशक्तपणानें उमटलेलीं काळसर रंगाचीं वर्तुळें त्यांच्या अशक्त चेहऱ्यावर जास्तच भेसूरता आणीत होतीं.

जवळच्या टेबलावर तस्त, ऊन पाणी, टॉवेल वगैरे होतें. हळू-हळू त्यांनीं तोंड धुवायला सुरवात केली.

" रात्रीं टेंपरेचर होतें का ? " प्रोफेसरांनीं विचारलें.

" छे,—९८॥ च होतं—आणखी किनई आज मला हुषारी पण वाटते आहे. " तेलाविना रुक्ष दिसणाऱ्या, विसकटलेल्या केंसावरून आपला क्षीण हात फिरवीत त्या म्हणाल्या. एवढ्यांत दार उघडून सोनूताई आंत आल्या. आणलेल्या चहाच्या कपबशा आणि थोडीं बिस्किटें त्यांनीं टेबलावर ठेविलीं.

" का, बराय् ना आतां... ? " असें सहास्य मुद्रेनें विचारून सोनुताई परत जाऊं लागल्या.

" इश्श् ! थांबा कीं जरा अगदीं..." विनवणीचें इंदिराबाईंचें वाक्य ऐकून त्या मागें वळून दारांतच उभ्या राहिल्या.

" ऐकलं का...! " इंदिराबाई पतिराजांना उद्देशून म्हणाल्या. " सोनुताईंच्या मनांतून पुण्याला जायचं आहे हो या महिनाअखेर. मला तसं त्या काल विचारीत होत्या. पण मीं कांहीं हो म्हटलं नाहीं. माझे किती हाल होतील त्यांच्यावाचून! एवढी माझी मिजास चालायची कशी मग ! " त्या किंचित् हंसल्या.

" सोनुताई... ! अन् जाणार ! " प्रोफेसरांना ती कल्पना-सुद्धां दुःसह वाटली. शेवटचा प्रश्न त्यांनीं खुद्द सोनुताईंनाच विचारला. सोनुताईंच्या गौर मुखमंडलावर प्रोफेसरांना किंचित् मिस्किल-पणाची छटा आढळली. त्यांच्या धनुष्याकृति भिंवया किंचित् आकुं-चित झाल्या होत्या. ओठांची मजेदार हालचाल करीत त्या म्हणाल्या—

" माझ्या मुलीची परीक्षा झाली आहे नुकतीच ! इतके दिवस ती होती माझ्या भावाकडे. आतां किती दिवस तिकडे राहील ? तोही आपला गरीबच आहे. म्हणून तिथंच जाऊन चार धंदे करून तिच्या-जवळच राहीन म्हणतें. त्यांना..." हें सांगतांना एक हात दाराच्या बाजूच्या लाकडावर ठेवला होता. दोन काळ्याभोर बांगड्या त्या गुबगुबीत हातांत घट्ट रुतून हाताची शोभा जास्तच वाढवीत होत्या— तिकडे प्रोफेसरांचें लक्ष गेलें. त्यांनीं क्षीण हातांनीं बशींत चहा ओतणाऱ्या इंदिराबाईंकडे पाहिलें. आणि तुलनात्मक विचार मनांत येऊन त्यांना कसेंसेंच वाटलें. त्या निस्तेज हातावर निळसर रंगाच्या मोठाल्या शिरा उठावदारपणानें दिसत होत्या. नखें पांढरीं फिकट पडलीं होतीं. आणि नाजुक बिलवरांचेंसुद्धां त्याला वजन सहन होत

नसावें असें वाटत होतें. परंतु या विचारानें प्रोफेसरसाहेबांना कसल्या-तरी सूक्ष्म वेदना होत आहेत असा भास झाला.

" मग नाहीं ना जाणार ! " इंदिराबाई स्नेहयुक्त स्वरांत बोलल्या.

" अं...अजून ठरलं नाहीं नक्की. " असें म्हणून सोनुताई तेथून निघून गेल्या.

× × ×

मोटारच्या हॉर्नचा कर्कश आवाज ऐकूं आला म्हणून प्रोफेसरांनीं सहज वर पाहिलें. पाठोपाठ ' घर्रर्रर्र ' असा मोटार थांबल्याचा आवाज झाला. " डॉक्टर आले वाटतं "— असें आपल्याशींच पुटपुटत ते पुढील कागद बाजूस सारून त्यांच्या स्वागतासाठीं उठले.

" हाउ इज दि पेशंट नाऊ...? " असें डॉक्टरनीं स्मित मुद्रेनें विचारलें आणि त्याला उत्तर म्हणून प्रोफेसर मुकाट्यानें आंतल्या खोलीकडे वळले. डॉक्टरही त्यांच्यापाठोपाठ आंत शिरले. नेहमींच्या डॉक्टरी संवयीप्रमाणें ' काय बराय् ना ? ' असें त्यांनीं हंसत हंसत इंदिराबाईंना विचारलें. नंतर त्यांनीं तपासणीला सुरवात केली. पाठीवर व छातीवर बोटांनीं आवाज करून व नळी लावून त्यांनीं लक्षपूर्वक ऐकलें. जीभ बाहेर काढायला सांगितली. नखेंही पाहिलीं. आणि जरा वेळानें ' ऑल राईट ! ' असें उद्गारून ते दिवाण-खान्यांत येऊन एका खुर्चीवर बसले. एक लठ्ठ चिरूट पेटवून ते चिंताकुल नजरेनें छताला टांगलेल्या मोठ्या स्टॅन्डकडे पहात राहिले. हें सर्व पाहून प्रोफेसरांना चमत्कारिकच वाटूं लागलें. कांहीं विशेष

असल्याशिवाय डॉक्टर असे स्तब्ध रहावयाचे नाहींत—तेव्हां काय असेल बरं !

एक भयंकर कल्पना मनांत येऊन प्रोफेसरांचें हृदय थरारलें. त्यांचा श्वासोच्छ्वास जोरांत चालूं लागला. कंपित स्वरांत त्यांनीं विचारलें " प्रकृति सुधारण्याच्या मार्गावर आहे ना ! "

डॉक्टरनीं थोडा विचार केला. नंतर ते एकदम म्हणाले—" हें पहा, उगीच आतां खोटें सांगून तुम्हांला फसवणें मलाही बरं वाटत नाहीं. अन् अगदीं अप्रिय सत्य तुम्हाला सांगण्याचा माझ्यावर वाईट प्रसंग आला आहे. पण उगीच आशा लावून ठेवण्यापेक्षां मन कठोर करून तुम्हांला खरें तेंच सांगावें हें बरें... " ते जरा थांबले. जणूं काय मन कठोर करावयाला थोडासा वेळ ते प्रोफेसरांना मुद्दा-मच देत होते. प्रोफेसरांचें हृदय जोरांत खालवर होत होतें. डॉक्टर काय तें लौकर सांगतील तर बरें असें त्यांना वाटत होतें.

" त्या आतां फारच थोड्या दिवसांच्या सोबती आहेत आणि त्यांचें दुखणें बरें होण्याच्या मर्यादेपलीकडे गेलें आहे. इतके दिवस मला जरा तरी आशा वाटत होती, म्हणून मी बोललों नाहीं. पण आज माझी नक्की खात्री झाली. आधीं त्यांचें आयुष्य थोडेंच राहिलें आहे. पण मानसिक त्रास झाल्यास त्यांचें त्यांतलेंही आयुष्य कमी होईल. तेव्हां या थोडक्या दिवसांत त्यांच्या मनाला त्रास होणार नाहीं असें आपण वागा. तुम्ही तसें वागत असालच. पण 'डेंजर वॉर्निंग' असली कीं मनुष्य सावधगिरी ठेवतो. " दोघेही पुष्कळ वेळ कांहीं बोलले नाहींत. प्रोफेसरांचा जड पावलांनीं त्यांनीं निरोप घेतला.

प्रोफेसर विचारमग्न स्थितींत आरामखुर्चीवर पडून राहिले. समोरच इंदिराबाईंचा मोठा एन्लार्ज केलेला फोटो टांगलेला होता. सर्व दिवाणखान्यांत इंदिराबाईंचें अस्तित्व दृग्गोचर करणाऱ्या कितीतरी वस्तू होत्या. दिवाणखान्याला शोभा आणणारीं सुंदर तोरणें, रिबन्-रेशीम-झीग वगैरेंनीं भरलेले सुंदर फोटो, कुशनवरील सुंदर विणकाम आणि ऑईलपेन्टिंगचे मनोवेधक देखावे—इंदिराबाईंचें हस्तकौशल्य उच्च अभिरुचि आणि दीर्घोद्योग यांचे मूर्तिमंत साक्षीदार होते.

या सर्वांकडे पाहून प्रोफेसरांच्या हृदयाला असह्य वेदना होऊं लागल्या. दार घट्ट बंद करून पुष्कळसें रडून हृदय मोकळें करावें असें त्यांना वाटलें. पण या विचारापाठोपाठ आपल्या दुर्बल हृदयाची जाणीव होऊन त्यांना लाज वाटूं लागली. त्यांचें लग्न झाल्याला अवघीं दोनअडीच वर्षेंच झालीं होतीं. हीं दोनअडीच वर्षें कशीं आणि कुठें गेलीं हें प्रोफेसरांना किंवा इंदिराबाईंना कळलें-सुद्धां नाहीं. इतकीं तीं सौख्यपूर्ण होतीं. इंदिराबाईंच्या प्रत्येक कृतीचें प्रोफेसरांना कौतुक वाटे. आपलें प्रेमसर्वस्व त्यांनीं इंदिरेच्या ठिकाणीं केंद्रीभूत केलें होतें. तर उलट इंदिरेनेंही पूर्ण पत्नीधर्मानें वागून आजपावेतों त्यांना शक्य तेवढें सौख्य देण्यांत हयगय केली नव्हती.

अस्तमानाचा सूर्यास्ताचा देखावा मनोहर दिसतो खरा; पण तो अल्पायुषी असतो आणि लौकरच अंधारमय रात्रीनें त्याच रमणीय स्थानाला भीषण भेसूरता येते. तसेंच इंदिरेच्या बाबतींत झालें होतें. तिचें निर्मल सौंदर्य आखणी ती सारी हुषारी या सर्वांनाच एका भयं-

कर आजारानें व्याप्त केलें. त्यांना बारीक ताप येऊं लागला व लौकरच त्याचें रूपांतर क्षयामध्यें झालें होतें.

इंदिराबाईंना माहेरचें कुणीही जिव्हाळ्याचें आप्त नव्हतें. प्रोफेसरांनाही नव्हतें. इंदिरेच्या आजाराच्या वेळींच इंदिराबाईंच्या जुन्या तोंडओळखीच्या सोनुताई पोटासाठीं कामधंदा शोधीत आहेत असें इंदिराबाईंना कळलें. ताबडतोब त्यांची गांठ घेऊन त्यांनीं आपल्याकडेच त्यांना ठेवून घेतलें. सोनुताईचें आगमन दोघांनाही अत्यंत इष्टच वाटलें. मोलानें का होईना—पण सर्व तऱ्हेचें काम काळजीपूर्वक, नीटनेटकें, स्वच्छ, वेळच्यावेळीं होत असलेलें पाहून दोघांनाही सोनुताईबद्दल आदर वाटूं लागला. पुन्हां सोनुताई सदा हंसतमुख असत. त्यांना वैद्यकीय औषधेंही थोडींफार माहीत होतीं. इंदिरेची सेवाशुश्रूषा तर त्या इतक्या प्रेमळपणानें करीत कीं इंदिरेला तर आपली दिवंगत माताच पुन्हां ईश्वरानें दिली असें वाटूं लागलें. प्रोफेसरांनाही त्यामुळें बरें वाटलें व धन्यानें नोकराकडे ज्या दृष्टीनें लक्ष द्यावयाचें तसें न देतां त्यांच्या मनांत सोनुताईबद्दल एक कर्तव्यदक्ष सन्मान्य स्त्री या पूज्य भावनेनें पाहण्याइतका आपलेपणा उत्पन्न झाला.

प्रोफेसरांचें वय चौतीस वर्षांचें होतें व सोनुताईचें तीसबत्तीशीच्या आसपास होतें. इंदिराबाई वर्षभर अंथरुणाला खिळून होत्या व त्या अवधींत त्यांचें सौंदर्यपुष्प हळूहळू कोमेजत चाललें होतें. इकडे सोनुताईंना चांगलें खाणेंपिणें, नीटनेटकीं लुगडीं मिळूं लागलीं व त्यामुळें अनास्थेनें फिकट झालेलें त्यांचें मूळचें रेंखीव सौंदर्य जास्तच

सतेज बनत होतें. गरीबींतही अमोल सौंदर्य केव्हां केव्हां आढळ-तेंच ना !

देवाच्या मस्तकावरून काढलेला निर्माल्य व पूजेसाठीं आणलेलीं ताजीं फुलें यांत जें अंतर तेंच इंदिराबाई व सोनुताई यांच्यांत आहे असें प्रोफेसरांच्या मनांत येऊं लागलें. सोनुताईसारख्या स्त्रीवर—सौंदर्यसंपन्न स्त्रीवर—वैधव्यांतलें गरीब जिणें जगविण्याकरितां दुसऱ्याचीं अशी मोलानें कामें करण्याचा प्रसंग यावा हें हिंदू समाजाच्या अवनतीचें यथार्थ दिग्दर्शन करणारें उदाहरण आहे असें प्रोफेसरांना वाटूं लागलें.

कां कोण जाणें, सोनुताईमध्यें कांहीं अवर्णनीय आकर्षकता आहे असें प्रोफेसरांना वाटूं लागलें. त्यांची दृष्टी त्यांच्या बाबतींत विषारी बनूं लागली. त्यांचें सर्व कांहीं त्यांना चांगलें वाटूं लागलें. आंतून सदसद्विवेकबुद्धीची त्यांना वरचेवर टोंचणी लागे कीं हें घडणारें स्थित्यंतर अत्यंत निंद्य आहे. पतित बनण्याच्या मार्गानें आपलें मन झपाट्यानें जात आहे ही त्यांना जाणीव होतीच. पण त्यांच्या या मनःस्थितीला नेहमीं गुप्त बांध घालणारी एक व्यक्ती—इंदिरेची कृश मूर्ति—नजरेसमोर आली कीं त्यांची त्यांनाच लाज वाटे.

बिचारी इंदिरा ! तिला प्रोफेसरांच्या मानससरोवरांतील खळ-बळीचा पत्ताही नव्हता !

× × ×

"सोनुताई... !" खालीं मान घालून केळफूल नीट करण्यांत गर्क झालेल्या सोनुताईंनीं चपापून वर मान केली. प्रोफेसर-

साहेब आपणास प्रत्यक्ष नांवानें संबोधून आपणांकडे रोखून पहात आहेत हें त्यांच्या लक्षांत आलें. मुकाट्यानें खालीं मान केळफुलांतली एक फणी त्यांनीं उचलली.

" सोनुताई ! " पुन्हां आलेल्या हांकेकडे दुर्लक्ष करणें आतां शक्यच नव्हतें.

" काय ! " त्यांचे मोठाले डोळे जास्तच विस्फारित झाले. कातर आवाजांत प्रोफेसरांनीं विचारलें, " मी तुम्हांला हेंच सांगायला आलों आहे कीं तुम्ही पुण्याला जाऊं नका. माझ्यासाठीं नाहीं–तिच्यासाठीं तरी रहा. आतां ही थोडक्याच दिवसांची सोबतीण आहे. " किंचित् सद्गदित आवाजांत त्यांनीं पुन्हां विचारलें, " ऐकणार ना माझें एवढें ! " आणि या वेळेला ते टक लावून त्यांच्याकडे पाहात होते.

अडखळत त्या म्हणाल्या, " पण माझी कमा—तिच्यासाठीं..."

" ती इकडे नाहीं का येणार ! " प्रोफेसरांच्या स्वरांत विलक्षण अधीरता प्रकट झाली.

विचारांत त्या अगदीं गढून गेल्या. दोन्ही हातांत फणी तशीच धरून त्या एकदम वर पाहून म्हणाल्या, " येईल. पण... ती फार मानी आहे. मी आपल्या घरीं मोलानं काम करतें अन् ती माझी मुलगी ! अर्थात् नोकराच्या मुलीशीं जसं वर्तन ठेवावं तसं जर तुमचं दिसलं तर पळभरसुद्धां ती इथं रहाणार नाहीं. इंदिराबाईच्या बहिणीसारखी—मैत्रिणीसारखी म्हणून ती इथें राहील. तसं तिच्याशीं तुम्ही वागलं पाहिजे. ती सुशिक्षित आहे, थोरामोठ्यांत

एकादा भुकेला माणूस तुमच्याकडे आला, तर तुम्ही त्याच्याशीं कसें वागाल ? ”

चंदूला दरदरून घाम आला. कालचीच ती गोष्ट! घरीं भुकेला माणूस आला असतांना आपल्या नीच वर्तनानें भर दोनप्रहरीं तो उपाशी तळमळत परत गेला ! हें बाळासाहेबांना कुणीं सांगितलें तर नाहीं ? चंदूचे हातापायांस कंप सुटला ! ती बोलण्याचा प्रयत्न करूं लागली; पण एक शब्दसुद्धां तिच्या तोंडून बाहेर पडेना ! !

नेहमींच्याच संवयीप्रमाणें माईसाहेब दाराआड उभ्या होत्याच ! चंदू कां बोलत नाहीं हें ताबडतोब त्यांच्या लक्ष्यांत आलें. त्या चट्दिशीं पुढें होऊन म्हणाल्या, “ चंदू, सांग बाळ. घाबरायचं काय त्यांत ? इथं कुणी परकीं का आहेत ? ” बाळासाहेबांकडे वळून त्या पुढें म्हणाल्या, “ किनई, कालच दुपारीं एक भुकेला माणूस आला, तर हिनें स्वतः त्याची नीट चौकशी करून त्याला पोटभर जेवायला घातलं ! धन्यवाद देत बिचारा संतुष्ट होऊन परत गेला ! अशी कोमल मनाची आहे हो चंदू ! पण आतां घाबरून गेल्यानं नीट सांगतां येईना, दुसरें काय ? आणि पहाण्याचा तिच्यावर हा पहिलाच प्रसंग—तेव्हां घाबरून जाणंही साहजिकच आहे. बाकी तुम्हांला कुठला त्याचा अनुभव म्हणा ! ! ” आपल्या विनोदानें आपणच संतुष्ट झालेल्या माईसाहेब दंतपंक्तीचें प्रदर्शन करत्या झाल्या.

पण बाळासाहेबांची चर्या अधिकाधिक संतप्त व लालबुंद होत आहे असें सर्वांना आढळून आलें ! “ अस्सें ! ” एवढेंच बाळा-

साहेब उद्गारले. पण तो आवाज ऐकून माईसाहेबांना कसेंसेंच झालें होतें.

" बरें, येतों ! मागून माझें खुलासेवार पत्र येईलच—"

" गुड् बाय ! "

" गुड् बाय ! "

× × ×

पांचसहा दिवसांनीं माणिकपूरहून बाळासाहेबांचें पत्र आलें. तें पुढीलप्रमाणें:—

* * * *

श्री माणिकपूर, ता......

ती. बापूसाहेब इनामदार, हिरापूर, यांना—

कृतानेक शिरसाष्टांग नमस्कार विनंती विशेष—

मीं आपणांस आश्वासन दिल्याप्रमाणें हें पत्र धाडीत आहें. सुमारें दहा वर्षांपूर्वी आपणांकडे बाळू या नांवाचा एक विद्यार्थी होता व त्याचा कांहीं अपराध नसतांना त्याजवर आपलें हरवलेलें घड्याळ चोरल्याचा आरोप लादून आपण घरांतून हाकलून दिलेलें आपणांस आठवत असेलच ! प्रथम आपणांस एक गोष्ट मला सांगावीशी वाटते ती हीच कीं, तो बाळू विद्यार्थी आणि माणिकपूरचे हल्लींचे जहागिरदार ह्या कांहीं दोन व्यक्ती नाहींत. मी आपलेकडून निघालों तो मुंबईच्या एका सज्जन गृहस्थाबरोबर त्यांचा प्रायव्हेट सेक्रेटरी म्हणून आफ्रिकेंत गेलों. तेथें जवळच माणिकपूरचे वृद्ध निपुत्रिक जहागिरदार राहात होते. त्यांच्या राहात्या वाड्याला आग लागली.

त्यांत ते सांपडले. स्वतःचा जीव धोक्यांत घालून मीं आगींतून त्यांचा जीव वांचाविला. त्याचा मोबदला म्हणून त्या उदार पुरुषानें आपली स्थावर जंगम इस्टेट व जहागिरी मृत्युपत्रांत माझ्या नांवाची केली ! थोडक्याच दिवसांपूर्वी आम्ही दोघे आफ्रिकेंतून परत आलों. त्यानंतर थोडक्याच दिवसांत ते मरण पावले व मृत्युपत्रान्वयें मी त्यांच्या अफाट ऐश्वर्याचा धनी बनलों.

ज्या वेळीं चंदूला पहाण्यासाठीं मी आलों त्याच्या आदलेच दिवशीं मी मुद्दाम दाढीमिशा चिकटवून अत्यंत हीन वेषानें आपले घरीं आलों होतों. त्यावेळीं आपल्या पत्नी व सन्मान्य कन्या चंदू यांनीं इतकें नीचपणाचें वर्तन केलें कीं, मी त्याची आठवण जन्मांत विसरणार नाहीं ! मात्र दुसरे दिवशीं त्याच नीचपणाला चांगुलपणाचा रंग देऊन चंदूची प्रौढी माझ्यासमोर सांगतांना माईसाहेबांनाही कांहींच कसें वाटलें नाहीं याचेंच राहून राहून आश्चर्य वाटतें. असल्या उर्मट, हलक्या मनाच्या माणसाशीं मी जन्माचा बांधला जाणें इष्ट नाहीं. सबब आपण आपल्या कन्येसाठीं दुसरा एकादा श्रीमान् योग्य वर पहावा. पैशाच्या श्रीमंतीपेक्षां मनाचा दिलदारपणा, मानसिक श्रीमंती मला पाहिजे होती. ती आपल्या कन्येंत नसल्यानें मला स्पष्ट नकार द्यावा लागत आहे याबद्दल अत्यंत वाईट वाटतें.

एका काळीं आपण मला विद्या शिकविली आहे ते उपकार मी वाटेल त्या रीतीनें फेडल्यावांचून राहणार नाहीं. आपलें हरवलेलें घडयाळ मींच चोरलें असें आपणांस वाटतें. म्हणून सोबत तीनशें रुपये नुकसानभरपाईदाखल पाठवीत आहें. त्यांचा स्वीकार व्हावा.

कधीं काळीं आपलें घड्याळ परत सांपडलें तर हे तीनशें रुपये माझ्या नांवें एकाद्या अनाथालयाला देणगी म्हणून द्यावेत.

माईसाहेब व चंदू यांना एवढेंच सांगावें कीं, पैशाच्या श्रीमंतीला मानसिक सद्गुणश्रीमंतीची अत्यावश्यकता आहे. श्रीमंत असलं कीं उमेट असलंच पाहिजे ही समजूत खास चुकीची आहे. आपणां-सारख्या श्रीमंताकडे याचना करूनसुद्धां गरिबाला दोन घास मिळूं नयेत हें तुम्हांस लांछनास्पद आहे. बापूसाहेब ! हें आपणांस तरी योग्य वाटतें काय ?

रागाच्या भरांत कांहीं कमजास्त लिहिलें गेलें असल्यास थोर हृदयानें आपण क्षमा करावी.

कळावें— सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

आपला,

पूर्वपरिचित—बाळू

ऊर्फ

बाळासाहेब जहागिरदार, माणिकपूर.

* * * *

वरील पत्र वाचून व एकंदर प्रकार कळून आल्यावर इनामदारां-च्या येथील मंडळींना काय वाटलें असेल याची वाचकांनींच कल्पना केलेली बरी ! ! !



# पुनर्विवाह



रात्रीचे नऊ वाजतां अप्पासाहेबांनीं टेबलाजवळच्या आराम-खुर्चीवर कलंडून नुकता ‘ वीकली टाइम्स ’ उघडला असेल नसेल इतक्यांत ‘ अप्पा ’ असें कोणसें मोठ्यानें म्हणालें. ‘ अप्पा ! ’ नेहमींसारखीच गोड हांक; परंतु अप्पांना त्यांतून नेहमींचा मंजुळ पडसाद ऐकूं आला नाहीं. उलट त्यांत प्रखर कठोरता ओतप्रोत भरली आहे असाच त्यांना भास झाला.

‘ अप्पा ! माझे शब्दहि तुम्हांला ऐकूं येईनासे झाले तर ! बाकी इतर गोष्टींप्रमाणें हेंहि साहजिकच आहे. असा फरक पडायचाच आतां पुढें ! ’

विमलचा स्वर अति तीव्र होता. त्यांतला उपहासाचा सूक्ष्म ध्वनि तर त्यांना बराच जाणवला. त्याच्या चर्येवरील प्रक्षुब्धतेच्या स्पष्ट छटा लपविण्याला ‘ वीकली टाइम्स ’ त्यांना फार उपयोगी पडला. चेहरा पूर्ववत् निर्विकार करून त्यांनीं टाइम्स किंचित् डावीकडे सरकवला व उसन्या प्रसन्नतेनें म्हटलें—

‘ विमाताई ! वाचनांत माणूस गढलं कीं एखाद्या वेळीं त्याला चटकन् ऐकूं येतहि नाहीं. त्याचा अर्थ मुद्दाम दुर्लक्ष केलं असा करणं तुला शोभतं का ! ’

'मला काय शोभणार! समाजांतून, सुखांतून खड्यांप्रमाणं बाजूला टाकलेल्या विधवेला कसं शोभणार कांहींतरी! चाळीस-पंचेचाळिसाव्या वर्षी बायको करणं मात्र पुष्कळांना शोभतं खरं!' शांतपणें ती उद्गारली.

अप्पा आश्चर्यानें मुग्ध झाले. विमल भारी शांत, विचारी मुलगी होती. विकाराच्या भरांत आजवर कधींहि तिच्या मनाचा उथळ-पणा असा व्यक्त झाला नव्हता. निदान अप्पांना तरी स्मरत नव्हता. पण समुद्र नेहमीं शांत दिसला, तरी तो कधींसुद्धां खवळत नाहीं असें थोडेंच आहे! त्याची गंभीर शांतता फक्त दिखाऊ. परंतु अंतरंगांत मात्र अनंत घडामोडी नित्यशः चालू असतात. अन् तुफान झालें म्हणजे तर सागराचें ऊग्र स्वरूप पूर्णांशानें प्रत्ययास येतें. अप्पांच्या घरांत असें कोणतेंतरी वादळ खास उद्भवलें होतें.

'काय बोलतेस! कांहीं आहे कीं नाहीं!' त्यांनीं दरडावणीचा आवाज काढला.

'अप्पा! तुम्हांला वाटतं दगडाप्रमाणं माझं मन आहे. अन् वाटेल त्या गोष्टी प्रत्यक्ष पाहून व ऐकूनहि मला त्याबद्दल कांहीं-एक वाटूं नये! मला भावना असतील असं तुमच्या कधीं मनांत तरी येतं का अप्पा!' विमलनें धीटपणानें सवाल केला.

'हो हो ऽ!' कोरडें हास्य जुलमानें करीत अप्पा उद्गारले, 'त्यावांचून का ही रागाची भावना दिसते आहे!'

'पुरें झालं!' चिडून ती म्हणाली, 'असं थट्टेवर नका नेऊं! खरंच का तें! हो, खरंच दिसतं आहे गप्प बसण्यावरून!'

' हो, आहे खरं ! करणारच आहे मी नवी बायको. मग काय करणार आहेस ? ' अगदीं निलाजरेपणानें असें पुटपुटत अप्पांनीं टाइम्स उघडून त्यांतलें स्नॅपशॉट्स्चें पान काढलें. विमलचें भाषण अप्रिय झालेलें सूचित करण्याचा त्यांचा हेतु पूर्ण सिद्धीस गेला. ही उपेक्षा अगदीं असह्नीय होती. क्रुद्धतेनें ताड्कन् ती म्हणाली, ' काय करणार ! शिव्याश्राप देणार ! समजलं ? '

ती माजघरांत आली. लाथेनें कोपऱ्यांतली वळकटी दाण्कन् पाडून ती तिनें उलगडली व त्यावर असहायतेनें डोकें टेकून हुंदके देण्यास सुरुवात केली.

× × ×

बिचारी विमल ! वयाच्या बाराव्या वर्षी माहेरीं कायमची आली होती. तिची आई मेल्याला उणेंपुरें वर्ष झालें, तोंच अप्पा दुसरें बाशिंग बांधण्यास सजलेले पाहून तिचें तरुण मन भारी बंडखोर-पणा करूं लागलें. आज तर उठल्यापासूनच तिचें चित्त थारीं नव्हतें. अप्पांचे कालचे शब्द आठवले कीं तिची व्याकुळता फारच वाढे. आज-वर दिसलेल्या त्यांच्या वत्सलतेला त्यांनीं काल स्वहस्तानें मनाबाहेर ढकलून घालवलें होतें व चमत्कारिक परकी भावनेला मनांत अगदीं ऐसपैस जागा दिली होती. हाच विचार तिला उन्हाळ्यांतल्या ऊष्ण झळ्यांसारखा तापदायी झाला होता. आतां दुपारीं ती अशीच सुंद बसली होती. जाड काळ्या रेघांचें एक कसलेंतरी कापडहि तिच्या मांडीवर पडलें होतें व हातांत सुई होती. त्यांतून दोरा जमिनीपर्यंत लोंबकळत होता. पण तिचें लक्ष होतें कुठें ? अप्पा पुनर्लग्न करणार

याच चमत्कारिक घटनेभोंवतीं फिरत होतें तें !

‘ काय विमलताई ! अप्पा आहेत घरीं ? ’

चमकून तिनें वर पाहिलें व प्रयत्नानें स्मित करीत उत्तर दिलें, ‘ या ना ! अप्पा बाहेर गेले. पण इतक्यांत आतां येतील. चहा-बिहा घ्या, तंवर येतील ! ’ आणि ती गडबडीनें स्टोव्हकडे वळली.

त्याला चहा देतांना तिची मघांची स्पष्ट खिन्नता चेहऱ्यावर खेळत असलेली त्याच्या लक्षांत आली.

‘ कळी उमलली वाटतं ! ’ तो हंसत म्हणाला.

‘ सूर्यागमनाबरोबर कळया उमलायच्याच ! ’ तिनें आपल्या नांवा-वरहि कोटी केलेली पाहून प्रभाकराला कौतुक वाटलें.

‘ काय पण इतकं काम होतं अगदीं ? ’ तिनें प्रश्न केला.

‘ खरं सांगूं ? ’

‘ इश्श, तेंसुद्धां मलाच विचारतां वाटतं ! ’

तो गंभीर झाला व चहांतून निघणाऱ्या वाफेकडे पहात राहिला. थोडया वेळानें तो म्हणाला—

‘ विमाताई ! काम प्रायव्हेट आहे. पण वाईट वाटेल तुम्हांला कदाचित् ऐकून ! ’

‘ बाबांना ‘ मुलगी ’ दाखवायची असेल एखादी ! ’ ती म्हणाली. तिच्या चर्येवर पूर्ण तिरस्कार उमटला होता. खालचा ओंठ तर इतक्या क्रुद्धतेनें तिनें घट्ट दाबून धरला होता कीं, भलतेच तिरस्काराचे शब्द अनिच्छेनें बाहेर पडूं नयेत म्हणून तिनें ही खबरदारी घेतली आहे कीं काय असेंहि प्रभाकराच्या मनांत आलें. तो ओशाळला.

कारण तिचा अंदाज अचूक होता. शरमिंध्या आवाजांत तो पुट-पुटला, ' विमाताई, तुमचं म्हणणं खरं आहे. पण त्या मुलीचे वडील माझ्या वडिलांकडे स्नेह्याच्या नात्यानें आले होते. मुलगी साधारण, हुंडा नाहीं ! अन् चार मुली ! त्या अगदीं नडलेल्या बापाची केंविलवाणी भीड वडिलांना मोडवेना. ते आजारी म्हणून नाइला-जानं यावं लागलं मला ! '

' होय का !— मग तुम्हीच कां नाहीं... '

या तिच्या थट्टेवर गडबडीनें तो म्हणाला—

' छे छे ! मला यंदां कर्तव्य नाहीं बुवा ! ' दोघांनाहि या वाक्यानें हंसूं आलें. इतक्यांत...... इतक्यांत अप्पा आले ! अगदीं अन-पेक्षित स्वर त्यांना ऐकूं आला—

' ओ हो ऽ ! प्रभा चल ना वर ! चल, वर बसावं किनी ! अगदीं तुला व्यवहार नाहीं बाबा. '

व्यवहारकुशल अप्पांच्या दृष्टीला विमलची ती वागणूक गैर भासली. त्यांनीं माडीवर जातांना तिच्याकडे जो दृष्टिक्षेप केला, त्यांत अविश्वास अन् संताप तिला पूर्णपणें दिसला. परंतु तिकडे दुर्लक्ष करून ती चोरपावलानें जाऊन जिन्यांत उभी राहिली. खालील प्रश्नोत्तरें तिच्या कानांत घुसूं लागलीं—

' सुंदर नसूं दे मुलगी. पण उफाड्याची तरी आहे ना ! '

' हं ! '

' तिचे वडील कां नाहीं आले मग ! '

' यंदां आपणास कर्तव्य आहे काय, एवढंच पहायला मी आलों.

पुढचं बोलणं तेच करणार आहेत. म्हटलं, नसलं कर्तव्य...... ’

‘ आहे आहे तर ! नाहीं कसं ! उद्यांच येतों मी मुलगी बघायला ! या वयाला बायकोसारखी काळजी मुलगीदेखील घ्यायची नाहीं. अन् तो ज्योतिर्भूषण दुराचारे त्यानं तर मला अगदीं पुत्रयोग आहेच म्हणून छातीठोक सांगितलंच आहे ! तेव्हां विवाहाचा योग असायचाच ! होय किनी ! ’

या शब्दांनंतरचें त्यांचें खदखदून हंसणें विमल व प्रभाकर या दोघांनाहि अगदीं कर्कश नि निर्दय वाटलें. विमल दांतओंठ खात पायऱ्या उतरली. अगदीं कडवट चर्येनें प्रभाकरानेंहि रस्ता सुधारला.

० ० ० ० ० ० ० ० ०

साऱ्यांनीं डोळेझांक केली ! त्या वठलेल्या जीर्ण खोडाला एक नव्या उमेदीची नवी वेली अर्पण करतांना ती केली तशीच विमलसारख्या सद्गुणी बालविधवेच्या निरुत्साही दुर्दैवी जीवनाकडेहि ती केली होती. इतरांनीं डोळेझांक केली त्यांत नवल नाहीं. पण प्रत्यक्ष अप्पांनीं, स्वतःभोंवतीं दिवे पाजळून भावी आयुष्य ( असलें तर ) प्रदीप्त करण्याची खबरदारी घेणाऱ्या त्या वृद्ध नवरदेवांनीं ती करावी, ही गोष्ट विमलला भारी तापदायक झाली. मनोविकार अप्पांसारख्या झाल्याकेल्या उतार वयाच्या मनुष्याला आंवरले नाहींत म्हणून समाजानें त्यांच्यावर कृपादृष्टि करून त्यांना पुनर्लग्न हौसेमौजेनें करूं दिलें. पण एवढ्याशा तरुण मुलीला जर ते आंवरतां आले नाहींत तर मात्र त्याच समाजांतला प्रत्येक घटक तिच्यावर टीकास्त्रांच्या विषारी भालेबरच्या रोखून शासनार्थ सज्ज होतो ! किती समदृष्टि ! बालविधवेला अन्

विकार ! अशक्य ! तिला मन असतं कुठं !

*    *    *

‘ काय विमल ! तूं दिवसेंदिवस वाळत कां चालली आहेस अशी ! काय होतंय तुला ! ’

अप्पांनीं एक दिवस चौकशी केली. पण त्यांत प्रेमळतेपेक्षां दांभिकतेचेंच मिश्रण अधिक होतेंसें तिला वाटलें. कारण आदल्याच दिवशीं तिच्या नव्या जहांबाज मातोश्रींनीं अप्पाना हळूच सुचवलेलें तिनें ओझरतें ऐकलें होतें— ‘ तुमची मुलगी हल्लीं धड जेवतसुद्धां नाहीं ! कांहीं ‘ भानगड ’ नाहीं ना ! मला तर बाई संशय येतो ! ’ त्याच वेळीं ती ताडकन् उठून तिथें जाऊन बोलणारसुद्धां होती कांहींतरी. पण लगेच फटक् फटक् असे जुने जोडे करकरलेले तिनें ऐकले व शेजारच्या खिडकीपुढून अप्पांची स्थूल आकृति डुलत डुलत चालती झालेलीहि तिला दिसली. कालच्या संतापांत आजच्या प्रश्नानें भर टाकली !

‘ मला ! ’ कडवट हास्य करीत तिनें उत्तर केलें— ‘ मला काय व्हायचं आहे ! रोग अन् मरण यांना सुद्धां आमच्या सारख्यांचा सहवास नको वाटतो, अप्पा ! ’

‘ विमे ! ’ अप्पा जोरांत ओरडून म्हणाले, ‘ तूं हल्लीं फार फाजिलपणानं बोलूं लागली आहेस बरं का ! ठीक लक्षण नाहीं दिसत ! अन् त्या शेजारच्या प्रभ्याशीं तुझी वावगी सलगी होत आहे हें ठीक नाहीं, सांगून ठेवतों ! विस्तवाशीं लोण्यानं स्नेह केला म्हणजे लोणीच पाघळतं, ध्यानांत राहूं द्या ! मला नाहीं असलं खपणार ! ’

'तें कसं खपेल तुम्हांला!' विमलसुद्धां रागाला चढली होती. 'तरुण बायकोपुढं माझं दर्शनसुद्धां तुम्हांला नकोसं न् खपेनासं झालं आहे तें मी जाणून आहें, अप्पा! पण मी तरी काय करणार! इथं कुचंबत राहण्यापेक्षां तुम्हीं मला कोणता मार्ग मोकळा ठेवला आहे तें सांगा. इतके दिवस घरांतले कोदे उपसण्यासाठीं घरांत डांबून ठेवलींत. कांहीं चार अक्षरं शिकूं दिलीं असतीं तर अशी खेटरपूजा मीं कदापि सोसली नसती. निदान शिवणक्लासांत जरी जाऊं दिलं असतं तरी माझा भार मीं तुमच्यावर पडूं दिला नसता! पण तुम्ही माझे जन्मदाते! माझ्या कल्याणाची काळजी तुम्हांला फार!' (सद्गदित झालेल्या तिच्या आवाजांत ह्या वेळीं उपरोधाची छटा उमटली.) 'चार टवाळ लोकांचीं पानपट्यांचीं दुकानं रस्त्यांत आहेत, असली पोकळ सबब तुम्हीं दाखवलींत. सगळ्याच बाजूंनीं असा कोंडमारा केलात अन् आतां माझा वीट करतां! उघड शत्रु बरा असल्या दुराग्रही आप्तापेक्षां!'

अप्पा अगदीं मूढ होऊन विमलचें भापण ऐकत होते. वीज केव्हांतरी चमकते, पण तिची क्षणिक लकाकी इतकी तेजस्वी असते कीं, पाहणाऱ्याचे नेत्र क्षणमात्र मिटल्यावांचून रहात नाहींत. आजवर मनाच्या दडपणाखालीं दडून बसलेला तिचा सारा पाणीदारपणा अप्पांना आजच प्रथम दिसला व त्या तेजस्वीपणानें त्यांना जरा दिङ्मूढ केलें होतें.

'विमल!' या त्यांच्या हांकेंत पूर्वीपेक्षां बरेंच मार्दव तिला भासलें. 'विमे! उगीच रागावूं नकोस! मीं वाईट काय म्हटलं बुवा!

हें ज्याचं त्याचं प्राक्तन आहे. कसला पाणीदार जांवई पाहिला होताऽ... हं ! नाहीं तुझ्या नशिबीं ! आतां आपलं घरांत मिळतं तें घ्यावं, रीतीनं रहावं अन् लोक निंदा करायचे नाहींत असं वागावं एवढं म्हटलं त्यांत वाईट अन् चीड येण्याजोगं मी काय बोललों सांग तूंच ! '

अप्पांचें बोलणें संपतांच शांतपणें ती म्हणाली, ' यांत वाईट कांहीं नाहीं ! मला जेवण जात नाहीं, अन् मीं वाळत चाललें आहें, शिवाय प्रभाकराशीं वावगी वागतें, या तिन्ही दुव्यांची जुळणी केली तरी वाईट नाहीं ? अन् माझ्या शीलाची खात्री असूनसुद्धां तुम्ही असले घाणेरडे शब्द बोलतां यांत तरी वाईट काय आहे ! '

अप्पांना यावर समर्पक उत्तर सुचेना. ते वर कडीपाटाला किती तुळया आहेत त्या मोजूं लागले व मोजणी संपल्यानंतर त्यांनीं आपलीं नखें फार वाढलीं आहेत किंवा काय यांची तपासणी सुरू केली.

इतक्या बिकट प्रसंगांतून सोडवायचें नाहीं तर अर्धांगीचें कर्तव्य तरी कोणतें ? पतिव्रतेचें व्रत पाळण्यांत सौ. माईसाहेबांनीं या वेळीं विलक्षण तत्परता दाखवली. त्या कमरेवर हात ठेवून अगदीं पवि-त्र्यांत दारांत येऊन उभ्या राहिल्या व म्हणाल्या, ' इश्शऽ ! पुरे मेला काथ्याकूट. तिकडे चहा चाललाय् निवून. ती केवढी, आपलं वय केवढं, अन् एवढ्याशा पोरीशीं कसला वाद घालायचा नाहीं तो ! उपदेशाचे दोन शब्द सांगायचे ! ऐकलं तर ऐकलं, नाहींतर सोडून द्यायचा नाद ! हो, नष्टाशीं हरलं अन् कडू कारलं ! चहा करायची नाहीं तर नाहीं, प्यायची तरी माईसाहेब कृपा करतील तर

बरं होईल !'

दूर जाणाऱ्या बैलगाडीचा त्रासदायक खडखडाट क्रमाक्रमानें कमी कमी ऐकूं येतो, शेवटीं अस्पष्ट व तुरळक होतो, अन् मग सर्व शांत होतें. माई न् अप्पा सैंपाकघरांत जातांना माईचींहि मुक्ताफळें अशींच प्रथम कर्कश, मग अस्पष्ट, अंधुक, ओझरतीं या क्रमानें तिच्या कानांवर आदळून शेवटीं तेथें अगदींच शांतता झाली.

०००  ०००  ०००

'विमाताई, हल्लीं तुम्ही माझ्याशीं धड बोलत सुद्धां नाहीं. कां बरं असं ? मी परवां आलों, त्या वेळीं अप्पा घरांत असून 'ठाऊक नाहीं' असं तुम्ही सांगितलंत. माझ्याकडून बोलण्यांत कांहीं चुकी झाली का ?... मला आठवत नाहीं, सांगा ना ?'

प्रभाकराच्या या बोलण्यांतली कळकळ तिला जाणवली. ती उदास मुद्रेनें म्हणाली, 'चुकी ? प्रभाकर, तुमची कसली चुकी ? पण आज देखील अप्पा न् माई दिवसाच्या नाटकाला गेलेत. रात्रीं आटाला या म्हणजे भेटतील अप्पा !'

'नाटऽक ! मग तुम्ही घरींच कशा तर ?' त्यानें विचारलें.

विमल मनापासून हंसली व म्हणाली, 'अप्पामाईसुद्धां 'येतेस का' म्हणून म्हणाल्या, पण दोघांत तिसरा. अन् डोळ्यांत कचरा खुपायला कशाला जायचं उगीच ? म्हणून मींच 'नाहीं' म्हटलं. बरं, ते आठ वाजतां येतील, मग भेटा तुम्ही येऊन.'

'म्हणजे पर्यायानं आतां इथून चालते व्हा, असंच ना ? जातोंच आहें. एवढं घालवून द्यायला नको.' हें बोलतांना प्रभाकराची

चर्या संतप्त दिसली.

तें बघून ती सहानुभूतिपूर्वक म्हणाली, 'प्रभादादा, रागावतां, पण प्रत्यक्ष वडील जिथं नाहीं ते घाणेरडे आरोप लादूं लागले, तिथं मीं असं फुंकून पाऊल टाकायला नको का? कालचीच गोष्ट सांगतें, म्हणजे मी इतकं चमत्कारिक कां वागतें तें कळेल.'

जरा थांबून तिनें आदल्या दिवशींचा साद्यन्त वृत्तान्त त्यास सांगितला. तोहि गंभीर झाला व विचार करीत तो उद्गारला, 'मग पुढं अशींच भांडणं करीत इथं राहणार?'

'मग कुठं जायचं? अन् अशा विधवा मुलीला एकाकी अन् विनाआधार राहावयाचं म्हणजे तरी धोकाच नाहीं का? शिवाय उदरंभरती...? हो...! सैंपाक! दुसऱ्यासाठी भाकऱ्या बडवणं हें तर अशिक्षित विधवेचं जीवनकार्य! तो मार्ग मात्र मोकळा आहे खरा. पण मला तर तो इतका अपमानास्पद वाटतो कीं, त्यापेक्षां मेलेलं पुरवलं!'

हताश, दीनस्वर अन् असले निर्वाणीचे उद्गार ऐकून कुणाचेंहि मन द्रवलें असतें. प्रभाकराला तर फारच वाईट वाटलें. कधींपासून त्याचें मन तिच्याकडे आकर्षित झालें होतें. तरी तिचा निग्रही, विचारी व गंभीर स्वभाव त्याला पूर्ण माहीत असल्यामुळें त्याच्या मनांतली ही गोष्ट अजून अनुच्चारितच राहिली होती व कदाचित् ती तशीच कायमची राहिली असती. परंतु आज वडिलांच्या रंगेल कृतीमुळें तिच्या मनाचा समतोलपणा नष्ट झालेला त्याच्या लक्षांत आला. आज विचारायचें धाडस करावें असें त्याच्या मनांत आलें.

कारण नेहमींपेक्षां तिची मनःस्थिति अपेक्षित उत्तर देण्याइतकी अनुकूल आहेसें त्याला वाटलें.

'विमल, एक विचारूं ? रागावशील ?' त्यानें भीतभीत प्रश्न केला.

'कालच्या अप्पांच्या प्रश्नाहूनहि कांहीं वाईट आहे काय ?'

'छे छे, काय हें विमल ! मी असं विचारतों, तूं सरळ पुनर्विवाह कां करीत नाहींस ? त्याचें मन धडधडत होतें. कारण तिच्या उत्तरावर त्याच्या भावी सुखाचा सोक्षमोक्ष अवलंबून होता.

त्याचा प्रश्न ऐकून ती चमकली व एका कसल्या तरी सुखसंवेदनेची एक लहर क्षणमात्र तिला जाणवली. परंतु दुसऱ्याच क्षणीं त्या कल्पनेची तिच्या बाबतींतली अशक्यता तिच्या मनांत आली. ती म्हणाली, 'प्रभादादा ! यापेक्षां पुनर्विवाह चांगला, कबूल. पण कुमारिकांनासुद्धां उत्तम स्थळ मिळणं दुर्लभ असतं, तिथं आमच्याप्रमाणं एकांगानं गौण वधू स्वीकारून कोण उगीच जननिंदा सहन करील ? तुम्हीच सांगा ? त्यांतून ज्या विधवा सुशिक्षित, सुंदर अन् सधन असतील त्यांचा मुळीं प्रश्नच उद्भवत नाहीं. आमच्यासारख्या अशिक्षित, निर्धन विधवा मुलींना कुणी पायपोसानं दिखील पुसत नाहीं, हें मला कळतं, प्रभादादा ! अन् तरी दिखील पुनर्विवाहाचा अशक्य कोटींतला विचार मी करीत बसूं काय ? प्रभादादा, सुधारणा ही फक्त अनुकूलता व शक्यता यांचीच मैत्रीण बरं ! अशक्यता व प्रतिकूलता तिच्या वैरिणीच नाहींत का ?'

प्रभादादाला कांहीं उत्तर सुचेना. शेवटीं तो म्हणाला, 'समजा,

एखादा झाला तयार, मग ! '

' मग पाहतां येईल. '

' म्हणजे जवळ जवळ......' त्याचें वाक्य अर्धेच थांबलें. कारण ' प्रभाकऽऽर ' अशी क्रुद्ध हांक त्याला ऐकूं आली. त्यानं मागें पाहिलें न् अप्पामाईचें दांपत्य परत आलें होतें. अप्पा अगदीं तिरसटपणें कपाळावर शेंपन्नास आंठ्या चढवून त्याजकडे रोखून पाहात होते. त्यांच्या जाड जाड ओठांतून पुन्हा वाक्यें उमटूं लागलीं—

' प्रभ्याऽ ! माझ्या अपरोक्ष या विमीच्या गुप्त भेटी घेतोस अं ! तुम्हांला नाहीं अन् नसेल, पण मला माझ्या अब्रूची चाड आहे. शेजाऱ्याचा मुलगा म्हणून एकदां गय करतों. पण उद्यांपासून येथें येण्यास तुला सक्त मनाई आहे, समजलास ! '

पतीला प्रत्येक गोष्टींत मनापासून सहाय्य करण्याचे माईचं पवित्र ब्रीदच होतें. त्या अप्पापेक्षांहि खवचट आवाजांत म्हणाल्या, ' इश्शऽ ! आपलाच दाम खोटा ! मग लोकांना कां बोलायचं तें ! हिनं कां गप्पा टोकीत बसावं आमच्या पाठीमागं ! मला वेडीला वाटलं, नाटकाला आपलं उगीच आली नाहीं म्हणून. पण हे ठरलेले संकेत मोडून कशा येणार बाईसाहेब ! मेलं सोन्यासारख्या भरल्या घरांत सदा तोंड दुर्मुखलेलं दिसतं. अन् आतां कोण खिदळणं ! त्या किल्लेदाराच्या वाड्यापर्यंत ऐकूं येत होतं आतां ! आमची नसूं दे, पण जनाची, निदान मनाची तरी ! '

विमलला आपल्या दुर्दैवी जीवनाची पूर्णतेनें स्मृति झाली.

प्रभाकर संतापानें चालता झाला होता, त्या दिशेकडे ती किती वेळ तरी शून्यतेनें पहात राहिली.

० ० ०  ० ० ०  ० ० ०

सरासरी महिन्यानंतरची गोष्ट. माईचें थाटामाटाचें डोहाळजेवण आदल्याच दिवशीं झालें होतें व त्याच्या दुसऱ्या दिवशीं सकाळीं अप्पा उद्विग्नतेनें खालील दोन चिठोरीं पारायणीत बसले होते.

( १ )

" विमल !

तुझी तयारी अन् कबुली असेल तर मी स्वतः पुनर्विवाह करण्यास तयार आहें. मला माहीत आहे, माझे आप्त माझ्याशीं दूरत्याच्या भावनेनें वागतील. पण तुझ्यासाठीं, विमल केवळ तुझ्यासाठीं मी त्या सर्वांचा आनंदानं त्याग करीन. मोक्षमोक्ष तुझ्या एका शब्दावर आहे.

—प्रभाकर."

( २ )

" अप्पा !

स्वतांच्या सुखापुढें तुम्हांला माझ्याबद्दल सहानुभूतीसुद्धां दाखवतां येत नाहीं. कुठेंच आतां मला मायेचा आसरा उरलेला नाहीं. तुम्हीं दोघांनीं तर कट्टया शत्रूप्रमाणें माझ्याशीं दावा धरला आहे. अप्पा, तुम्हीं लग्न करून मायेचं माणूस मिळवलं. पण तुमचं प्रेम मला पारखं झालं आहे. तुमच्या लाडक्या पत्नीचीं डोहाळजेवणं अन् सोपस्कार पाहून मला कांहींच वाटूं नये अशी तुमची अपेक्षा

माझ्यानं साध्य होत नाहीं. इतके दिवस शुद्धतेनं वागल्याचं चीज तुम्ही मला कलंकिनी ठरवूनच केलंत ना ! जाऊं दे. मला जास्त कांहीं सांगायचं नाहीं. एकच ! मी पुनर्विवाह करणार आहें. तुम्हीं पुनर्लग्न नाहीं का केलंत ? मला दोष देतां यायचा नाहीं तुम्हांला !

—विमल."

कां कोण जाणे ! अप्पांच्या कठोर नयनांतून दोन अश्रु विमलच्या चिटोऱ्यावर गळले. विमलबद्दल त्यांचें हृदय नव्यानें आर्द्र झालें होतें कीं काय, देव जाणे !

